# १

माझ्या साहित्यिक जीवनाच्या दृष्टीनं सन १९१२ च्या फेब्रुआरी महिन्यात माझा जन्म झाला. माझी पहिली लघुकथा लिहिली गेली, प्रसिद्ध झाली, आणि मी लिहिलेला मजकूर संपादकांनी मोबदला देऊन घ्यावा इतक्या योग्यतेचा असतो असा शोध मला लागला! आपण अधिक लिहावं अशी इच्छा माझ्या मनात उत्पन्न झाली!

यावेळीं मी अठरा वर्षांचा होतो. तोंपर्यंतचं माझं वाचन अगदीं मर्यादित आणि अल्प होतं. लिहिण्याचा प्रयत्न तर मीं मुळींच केला नव्हता. ज्यांनीं वयाच्या सोळा वर्षांच्या आतच विपुल ग्रंथवाचन केलं, व दहावीस गोष्टी, एखादी कादंबरी अथवा एखादं नाटक लिहिलं अशा नामांकित लेखकांचीं चरित्रं लिहिण्यास सरावलेल्या चरित्रकाराच्या दृष्टीनं माझा लहानपणाचा वृत्तान्त निराशा करणारा ठरेल. लेखक या नात्यानं माझे पाय पाळण्यांत मुळींच दिसले नाहीत. लेखनाची बाब सोडून नुसत्या वाचनाचा विचार केला तरी, माझी वाचनाची हौस असामान्य होती असं मुळींच म्हणता येणार नाहीं. माझ्या वयाचीं पहिली दहा वर्षं मोठ्या

शहरापासून दूर अशा लहानसहान गावात गेली. १९०४ साली माझे वडील नोकरीनिमित्त प्रथम पुण्यास आले, तोंपर्यंत मी वर्तमानपत्र डोळ्यानीं पाहिलं नव्हत. मला पक्कं स्मरत कीं, ' केसरी ' पत्राचा अंक जेव्हां प्रथम माझ्या हातीं आला तेव्हा उभा कॉलम वाचण्याऐवजीं मी सरळ सारे कॉलम ओलांडून आडव्या ओळी वाचूं लागलों, व त्या मजकुराचा तेव्हां मला कांहीच बोध होईना म्हणून मी आपल्या वडिलांना विचारल तेव्हां वर्तमानपत्र वाचण्याचं ' टेक्निक् ' मला त्यांच्याकडून कळल !

नूतन मराठी विद्यालयात मी इंग्रजी शिक्षण घेऊं लागल्यापासून एक हुशार होतकरू विद्यार्थी म्हणून लोक मला ओळखूं लागले. परतु माझ्या अध्यापकांना माझ्या हुशारीपेक्षा माझ्या खोडकरपणावरच अधिक नजर ठेवावी लागत असे, व समवयस्क विद्यार्थ्यांत मी प्रिय झालो याचहि श्रेय माझ्या अभ्यासातील हुशारीपेक्षां वर्गात परोपरीचे पेचप्रसग उत्पन्न करण्यातल्या हुशारीलाच अधिक मिळाल्यासारख होतं. शाळेंतल्या विषयांपैकीं इंग्रजी व मराठी गद्यपद्याच्या तासात माझं चित्त सगळ्यांत अधिक रमत असे हें खर; तथापि नेमून दिलेल्या धड्यांपलीकडे वाचन करण्याची बुद्धि मला कधीं झालीं नाहीं. अभ्यासाच्या पुस्तकांतले उतारे मला आवडत असत; परंतु विस्तृत वाचनाची विद्यार्थ्याला चटक लावण्याचा जो अशा उताऱ्याचा उद्देश असतो तो माझ्या बाबतींत सिद्धीस गेला नाहीं. माझ्या ओळखीच्या कोणत्याच हुशार विद्यार्थ्याला तशी चटक लागलेली मला आढळली नाहीं.

याचं कारण मुख्यतः असं असेल कीं, आम्ही त्या वेळचे विद्यार्थी आजच्याहून फार वेगळ्या परिस्थितींत होतों. एकंदर साक्षर वर्गात साहित्य व साहित्यिक यांजबद्दल जी तीव्र उत्सुकता व जिज्ञासा आज दृष्टीस पडते ती त्या काळांत एकसहस्त्रांशानसुद्धा अस्तित्वात नव्हती. चिपळूणकर, आगरकर यांचे अवतार नुकतेच होऊन गेले होते. टिळकांचा ' केसरी ' जोरांत चालू होता. हरिभाऊ आपटे विपुल ललितलेखन करीत होते. तथापि शाळेच्या अल्पवयी विद्यार्थ्यांपर्यंत ज्याचं लोण पोचावं असा त्यांचा बोलबाला झालेला नव्हता. आज महाराष्ट्रांत शाळेंत जाणारीं अल्पवयी शेपन्नास तरी अशी मुल आढळतील, कीं ज्यानीं आजच्या प्रमुख साहित्यिकांपैकीं

चार सहा तरी प्रत्यक्ष डोळयानीं पाहिले आहेत, व त्याच्या सह्या संग्रहीं ठेवल्या आहेत. उलट पुण्यातल्या पुण्यात असून मी टिळकांना प्रथम पाहिल तें किती तरी उशिरा, आणि ज्याच्या कादंबऱ्या वाचण्यांत मी पुढें कित्येकदां रात्रीच्या घटकान् घटका घालविल्या ते हरिभाऊ आपटे माझ्या प्रथम दृष्टीस पडले ते मी युनिव्हर्सिटीची पदवी संपादन केली त्यानंतर ! सारांश, साहित्याबद्दलचा उत्साह भोवतालच्या परिस्थितींतच त्या वेळीं नव्हता. 'आनंद' मासिकाचे संस्थापक श्री. वासुदेव गोविंद आपटे हें तर आमचे शिक्षक होते. शाळेंतल्या नाट्यप्रयोगाच्या निमित्तानं त्यांच्याशीं आमचा निकट परिचयहि झाला होता. तथापि आमच्या कधीहि असं मनात आल नाहीं कीं, त्याच्या मार्गदर्शकत्वाखाली वाचन कराव अथवा आपण काही लिहाव आणि तें त्याना दाखवाव. असले विचार त्या वेळीं हवेंतच नव्हते.

तें कसहि असो, येवढ खरं कीं, इंग्रजी शाळेंत शिकत असल्यापासून माझ्या स्वभावातील साहित्याची गोडी जरी माझ्या निदर्शनास आली, तरी विस्तृत वाचनानं तिची जोपासना करावी अस मला कधींच वाटल नाही. मराठी ललितसाहित्याच वाचन मीं या वयात केल तें सर्वस्वीं योगायोगान झालं तेवढच. 'केसरी', हरिभाऊ आपट्याची 'करमणूक' व त्या काळात पहिल्या प्रतीच समजल गेलेल 'मनोरंजन' मासिक ही नियतकालिकं, कधींकधीं हातीं लागणाऱ्या कादंबऱ्या, व त्या सुमारास गाजलेली खाडिल-कराची नाटक येवढाच माझ्या वाचनाचा विस्तार होता.

कॉलेजांत प्रवेश केल्यावर पहिल्या वर्षाच्या परिक्षेसाटीं स्कॉट्चं 'लेडी ऑफ् दि लेक' हें काव्य, आणि डिकन्सची 'ए टेल ऑफ टू सिटीज्' ही कादंबरी मला परिक्षेसाटीं अभ्यासावीं लागली. स्कॉटच्या कवितेत माझं चित्त मुळींच रमलं नाहीं. काव्याची मोहिनी वाटावी यासाटीं भावनेच्या हळुवारपणाची जी अतीवता लागते ती माझ्या स्वभावांत, मला वाटतं, त्या वेळीं देखील नसावी. डिकन्सची कादंबरी मात्र मला अतिशय आवडली व इंग्रजी कादंबऱ्याचं वाचन करण्याची हौस त्या पुस्तकानच प्रथम माझ्या मनात निर्माण केली. तथापि लहानांनीं मोठ्याशीं साहित्य-विषयक गप्पा माराव्यात हें त्या वेळच्या एकदर चालीरीतींना धरून

नसल्यामुळें मला चांगला मार्गदर्शक मिळाला नाहीं, आणि वाचनात मला तारतम्य ठेवतां आलं नाहीं. फर्ग्युसन कॉलेजच्या लायब्ररींतल्या कादंबरी-विभागावर मीं हल्ला चढविला, लूटमार करताना हाताला लागेल ते घेऊन पळणाऱ्या सैनिकाप्रमाणें मी वागलों, स्कॉट, डिकन्स, लॉर्ड लिटन, रेनॉल्ड्स, मारी कॉरेली इत्यादींचीं जीं पुस्तकें मिळतील तीं वाचून काढण्याचा मी पूर्ण बेशिस्तीनं सपाटा लावला. मात्र या सर्व पुस्तकापैकीं 'ए टेल ऑफ टू सिटीज्' या कादंबरीइतकी दुसऱ्या कोणत्याच पुस्तकाची माझ्या मनावर छाप पडली नाहीं. ज्याचा परिक्षेसाठीं अभ्यास करावा लागतो तें पुस्तक विद्यार्थ्यांच अंतःकरण सहसा जिंक शकत नाहीं, या सामान्य सिद्धांताचा अनुभव इतर पुस्तकाच्या बाबतींत मला आलेला आहे. परंतु 'ए टेल ऑफ टू सिटीज' या नियमाला अपवाद ठरली. तिन माझ्या ठिकाणची ललितवाङ्मयाची तोपर्यंत सुप्त असलेली आसक्ति अगदीं तीव्रतेन जागृत केली असली पाहिजे. त्या कादंबरीची अगदीं स्वस्तातली स्वस्त आवृत्ति मी विकत घेतली होती. या आवृत्तींत प्रस्तावना, नोट्स इत्यादि कांही एक नव्हत. परतु मीं स्वतः कादंबरी पुनः पुन्हा वाचून काढून तिचं स्वरूप, तिच्यातील पात्रांचं स्वभावदर्शन, तिच्यात दिसून येणारी लेखकाची शैली व विनोदबुद्धि इत्यादि संभाव्य प्रश्नावर ज्या नोट्स तयार केल्या त्या इतक्या चांगल्या ठरल्या, कीं आम्हांला ती कादंबरी शिकवणारे प्रो. राजवाडे यांनीं सहामाही परिक्षेतली माझी उत्तरपत्रिका वर्गांत वाचून दाखविली, आणि वर्षाअखेरीस युनिव्हर्सिटीच्या परिक्षेतहि मला इंग्रजीच्या पेपरमध्यें पहिल्या प्रतीचे मार्क मिळाले.

परंतु अजूनहि—म्हणजे वयाच्या सतराव्या वर्षाच्या अखेरीसहि आपण कांहीं लिहूं शकूं किंवा लिहून पहावं असं माझ्या मनांत आलं नव्हत. डिकन्सच्या 'ए टेल ऑफ टू सिटीज्' या पुस्तकाच्या वाचनानं माझा पुष्कळच फायदा झाला. पहिली गोष्ट अशी कीं पूर्वी हरिभाऊंच्या कादंबऱ्या वाचतांना कादंबरी घ्यायची अन् भरारा वाचून काढायची एवढच मला माहीत असे; कादंबरीची चिकित्सा करायची असते, ही कल्पनाच नव्हती. पण डिकिन्सची कादंबरी परीक्षेसाठीं वाचूं लागलों—आयत्या मिळणाऱ्या बाजारी नोट्सच्या साहाय्यावाचून वाचूं लागलो—तेव्हां ही दृष्टि मला

आली. शिवाय आपण इंग्रजी भाषा चागली लिहू शकतों हा प्रत्ययहि त्या पुस्तकाच्या निमित्तानं मला आला. तथापि आपण लेखक व्हावं अशी इच्छा त्या पुस्तकान माझ्या मनांत निर्माण केली नाहीं. ती निर्माण व्हायला आणखी थोडा अवधि होता, व आणखी कांहीं कारण घडायचीं होतीं.

१९१३ सालच्या हिंवाळयात कॉलेजातील पहिल्या वर्षाच्या परीक्षेसाठीं मी मुंबईस गेलों असताना ( त्या वेळीं वार्षिक परीक्षा उन्हाळयात ठेवण्याची अजब कल्पना युनिव्हर्सिटीनं अमलांत आणलेली नव्हती. ) आमच्या वर्गातलेच राम गणेश गडकरी यांच्या 'प्रेमसंन्यास' नाटकाच्या हस्तलिखिताचं वाचन 'माधवाश्रमां'तील एका खोलींत मित्रमंडळींच्या खाजगी बैठकींत झालं तेव्हा मी हजर होतों. तें नाटक ऐकून गडकऱ्याच्या बुद्धिवैभवाबद्दलचा माझा आदर तर वाढलाच, परंतु आपण कां कांहीं लिहून पाहूं नये असा विचार त्या वेळीं प्रथम माझ्या मनात आला. त्या रात्रीं झोप लागेपर्यंत त्या कल्पनेनं माझी सोबत केली; आणि मी मुंबईहून परत आलों तो दोन गोष्टी घेऊन. एक, बासरी वाजवायला शिकायचं ठरवलं होतं म्हणून एक पॅरिस मेकची बासरी, अन् दुसरी, लेखन करावं ही कल्पना.

माझ्या सबंध आयुष्यावर या दोन्ही गोष्टींचा फार मोठा परिणाम झाला. माझ्या पुढील आयुष्यात माझ्या स्वभावातील सगीतप्रियता सतुष्ट करण्यासाठीं जें काहीं मी केलं त्याचा प्रारंभ या बासरीन केला; आणि माझ्या साहित्य–व्यवसायाचं उगमस्थान या कल्पनेंत होतं.

मात्र परीक्षेनतर मोठी सुटी असूनहि लिहिण्याची कल्पना माझ्याकडून अमलात आली नाहीं. ती यावयास १९१२ सालच्या उन्हाळयाच्या आधीं जे निमित्त–कारण झालं तें मोठं चमत्कारिक होतं.

माझे एक स्नेही मुंबईस होते. उन्हाळयाच्या सुटींत मजेनं त्याच्याकडे मुंबईस जाण्याची मला इच्छा झाली. त्याबद्दल वडिलाना विचारण्याचं मला धैर्य होईना. उगीचच्या उगीच मी मुंबईस जावं इतके आम्ही श्रीमंत नव्हतो हें मला माहीत होतं. वर्षाकाठीं आठ आणे वार कापडाचे दोन कोट व चार शर्ट वापरावे इतक्या काटकसरीन मी राहात होतों. परंतु असं मात्र मनांत आलं कीं मुंबईस जाऊन येण्याच्या खर्चापुरते पैसे आपण मिळविले तर जायला वडिलाची परवानगी मिळेल. म्हणून मी विचार करूं

लागलों कीं, पैसे कसे मिळवायचे. आणि एकदम एक धाडसी कल्पना मनात आली. आपण एखादी गोष्ट लिहिली व तिच्यावर कांहीं कमाई केली तर ?

त्या वयांत आणि मी पूर्वी कधीं कांहीं लिहिलं नसताना, मी असा विचार करावा हें आज माझं मलाच किती धाडसाच अन् हास्यास्पद वाटत. ज्यानं कधीं तोंडान ' सा, रे, ग, म ' केल नाहीं अशा अल्पवयी तरुणानं जाहीर जलसा करून पैसे मिळविण्याचा बेत करावा हेसुद्धा माझ्या त्या कल्पनेपुढें कमी धाडसाचं ठरल असतं ! पण ती कल्पना माझ्या मनात आली तेव्हां तिच्यांतली अव्यवहार्यता अगर अशक्यता मला दिसलीच नाहीं. अगदीं सरळ, सहज साध्य कल्पना म्हणून माझ्या मनानं ती पकडली. गोष्ट लिहून पैसे मिळवावयाचे अन् मुंबईला जायचं याबद्दल माझ्या मनाचा अगदीं निश्चय झाला. मी विचार करू लागलो तो फक्त एकाच गोष्टीचा. गोष्ट लिहायची खरी, पण ती कसली लिहायची ?

अखेर मीं जी गोष्ट लिहिली ती एक गुप्त पोलिसाच्या चातुर्याची कथा होती हें आजच्या माझ्या वाचकाना खरंमुद्धां वाटायच नाहीं. परंतु तशी ती होती खरी. अन् तिच नाव काय, तर ' मेणाचा ठसा ' ! मला वाटतं गुप्त पोलिसाच्या चातुर्याच्या भानगडींत मी पडलो याचीं मुख्य कारण दोन होतीं. पहिल अस कीं, त्यावेळीं 'मनोरंजन' मासिकांत असल्या गोष्टी दर अंकांत येत असलेल्या पाहून मला वाटल कीं या मालाला मागणी जरा जास्त दिसते, तेव्हा आपण त्या दिशेनच प्रयत्न करावा. दुसरं कारण असं कीं मी स्वतः त्यावेळीं डिकन्स बिकन्स बाजूला टाकून कॉनन डॉइलचीं सारीं पुस्तकं वाचून काढीत होतों; व गुप्त पोलिसाची एखादी गोष्ट लिहायची म्हणजे मनाशीं एखादं कोडं आधीं सोडवून ठेवून मग तें वाचकांपुढें उलट्या क्रमानं माडण्याचा एक गमतीचा खेळ आहे असं मला वाटू लागलं होत. हा खेळ खेळून पाहण्याच मी ठरविलं, व 'मेणाचा ठसा' ही गोष्ट तयार केली. ज्या मासिकात ती छापून आली त्याच्या जुन्या फायलींतून आजचा माझा कोणी उद्योगी वाचक ती धुंडाळून काढणार नाहीं अशी मला आशा आहे.

मराठी ललितसाहित्यावर माझ्या हातून घडलेल्या त्या पहिल्या अत्याचाराची आठवण जरी मला कांहींशी लज्जेची व विनोदाची वाटत असली, तरी त्या वेळीं मात्र तो अत्याचार अगदीं हात चळूं न देता बेडरपणानं मीं केला. माझ्या धाष्टर्याची कमाल अशी कीं, ती गोष्ट नुसती छापून यावी येवढीच माझी महत्त्वाकांक्षा नव्हती; मला तिचा मोबदला मिळायला हवा होता !

मी त्या गोष्टीचं हस्तलिखित घेऊन एका प्रकाशकाकडे गेलों तेव्हांची हकीगत ऐकण्यासारखी आहे.

## २

त्या वेळीं ‘ केरळकोकिळ ’ नांवाचं एक लहानसं मासिक क्राउन साइज् आकारांत निघत असे. श्री. अच्युत चिंतामण भट नांवाचे गृहस्थ तें काढीत असत. वास्तविक हें मासिक फार जुनं व लौकिकाचं असून त्याच्या मूळ सस्थापकाकडून श्री. भट यानीं तें चालविण्यासाठीं घेतलं होतं इत्यादि गोष्टी मला त्यावेळीं माहीत नव्हत्या. तें मासिक माझ्या आढळात येण्यास जें कारण झालं त्याचाहि माझ्या वाचनाच्या हौसेशीं कांहीं सबंध नव्हता. त्या सुमारास बुद्धिबळं खेळण्याचा मला विलक्षण नाद लागला होता व ‘ केरळकोकिळ ’ मासिकाच्या प्रत्येक अंकांत बुद्धिबळाचा एक डाव घातलेला असे, म्हणून मला तें माहित झालं. या मासिकाचं वेष्टन चाळता चाळतां ‘ लेखकांना मोबदला दिला जाईल ’ असं मी वाचलं होतं; तेव्हा आमचा ‘ मेणाचा ठसा ’ तयार झाल्यावर तो घेऊन आमची स्वारी श्री. भट यांच्या भेटीला गेली. बालाजीच्या देवळासमोरच्या त्यांच्या घरांतल्या दिवाणखान्याचा जिना मी चढलों तो अगदीं धडधडत्या अंतःकरणानं. दिवाणखान्यांत पाऊल टाकलं, आणि समोर खिडकीजवळच्या आराम-

खुर्चीत रस्त्यातल्या रहदारीकडे बघत बसलेल्या गृहस्थाना मीं विचारलं, "मला भटांना भेटायचं आहे..."

ते गृहस्थ म्हणाले, "माझंच नांव भट. काय काम आहे ?"

अच्युतराव भट दिसायला कांहींसे उग्र होते. ते शरीरानं चांगलेच जाडजूड होते, व डोळ्यावरचा चष्मा आणि तोंडावरच्या भरघोस मिशा याच्या योगानं त्याचा चेहरा माझ्यासारख्या एका पोरसवद्या तरुणाच्या मनांत दरारा उत्पन्न करण्यासारखा होता. मात्र ते जेव्हां हंसत तेव्हां किंचित् गद्गद्स्वरानं पण अगदीं दिलखुलास. "मी एक गोष्ट लिहून आणली आहे ती द्यायची आहे," अस माझं उत्तर ऐकल्याबरोबर "असं का ?" म्हणून ते जेव्हां हंसले, तेव्हा मला प्रथम क्षणभर वाटलेली भीति एकदम नाहींशी झाली. मला धीर आला. अच्युतरावांनीं माझ्या हातांतले कागद घेतले, वरवर चाळून पाहिले अन् म्हटल,

"मंगळवारीं या, म्हणजे पसंत आहे कीं नाहीं तें सांगेन."

मी विचारल, "माझी गोष्ट पसत पडून घेतलीत तर मला मोबदला मिळेल ना ?"

अच्युतरावानीं माझ्याकडे आपादमस्तक दृष्टि टाकली व नक्कल करायला फार अवघड अस आपलं खास घोगरं हास्य करीत ते म्हणाले, "होय, मिळेल."

मी त्यांना नमस्कार करून जिना उतरलो. माझ्या माग भरघोंस मिशाचा, उग्र चेहऱ्याचा, परंतु मधुर स्वभावाचा तो जाडजूड प्रकाशक आपल्या कारकुना-जवळ माझ्याबद्दल काय बोलला असेल याची मी कधीं चौकशी केली नाहीं.

मंगळवारीं मीं अच्युतरावाना पुन्हा जाऊन भेटलों तेव्हा त्यानीं एकदम मला सागितलं, "तुमची गोष्ट मला आवडली; आमच्या येत्या अंकातच ती येईल."

आणि मग त्यांनीं कांहींशा जिज्ञासेनं माझी माहिती विचारून घेण्यास प्रारंभ केला. मी फर्ग्युसन कॉलेजांत इंटरमीजिएटच्या वर्गांत आहे असं मीं त्यांना सागितल तेव्हा कांहींशा संशयी नजरेनं त्यांनीं माझ्याकडे पाहिल.

अच्युतरावानीं गोष्टीबद्दलचा निर्णय ज्याप्रमाणें अगदीं सागतों म्हटलं त्या दिवशीं वक्तशीरपणें सांगितला, त्यापमाणेंच गोष्टीचा मोबदलाहि त्यांनीं ताबडतोब दिला.

मी मुंबईस जाण्याचा माझा बेत पार पाडूं शकलों.

जीवनासाठीं कला किती उपयोगी पडते याचा लेखनाच्या उद्योगाच्या अगदीं प्रारंभीच अशा प्रकारें मला प्रत्यय आला तरी पुढें वेळ आली तेव्हा ' जीवनासाठीं कला ' अशी आरोळी मारण्याचं मी नाकारलं हा एक चमत्कारच म्हटला पाहिजे !

" अमक्याला साहित्याचा डास चावला " असं म्हणण्याचा इंग्रजींत परिपाठ आहे. आता मला असा डास चावला होता, आणि पहिलीच गोष्ट अशी सहजासहजीं खपल्यानंतर मी स्वस्थ बसेन हें शक्यच नव्हतं. प्रसिद्धीचं द्वार माझ्यापुढें अकल्पितपणें खुलं झालं होतं. मी लिहिण्याचा उद्योग सुरू ठेवला. त्या सुमारास कै. अच्युतराव कोल्हटकर टोपणनांवानं ( तें नक्की काय होतं तें मी आता विसरलों ) ' केरळकोकिळ ' मासिकात गोष्टी लिहीत त्या मला फार आवडत, व आपली लिहिण्याची शैली तशी चटकदार असावी असं मला वाटूं लागलं. ' मारी कॉरेलि ' हिच्या कादंबऱ्याचा तेव्हा फार बोलबाला झालेला होता. त्या मी वाचल्या तेव्हा माझ्याहि मनावर त्यांची मोठी मोहिनी पडली. तिच्या ' Thelma ' या कादंबरीचं रूपांतर करतां येईल असं मला वाटलं, आणि तें तयार करून अच्युतरावांना दाखवतां त्यांनाहि तें पसंत पडलं. माझी ती रूपांतरित कादंबरी ' केरळ–कोकिळ ' मध्यें क्रमशः येऊं लागली.

अठरा वर्षांच्या मुलाला विचारात घेण्यासारखीं मतं असतात असें कबूल केलं तर माझीं त्या वेळचीं सामाजिक मतं मोठीं चमत्कारिक होतीं. खरं म्हणजे तीं माझीं नव्हतीच. ज्या मताचा त्या वेळीं बहुजन समाजावर विशेष पगडा होता तींच माझीं मतं असं मला वाटत होतं, व तीं मी बोलून दाखवीत असे. आम्हां तरुण विद्यार्थ्यांत टिळकांच्या व्यक्तिमत्तेबद्दल अमर्याद आदर होता, व सामाजिक सुधारणेस त्यांचा विरोध आहे असं आम्हांला वाटे. त्यामुळें स्त्रीशिक्षण, प्रीतिविवाह, इत्यादि प्रकारास दूषण देणं हा राष्ट्रीय वृत्तीचा एक भागच आहे अशी आमची समजूत झाली होती. आजचा तरुण विद्यार्थी बहुधा नवमतवादी असतो. उलट विसाव्या शतकाच्या दुसऱ्या दशकांतला तरुण विद्यार्थी सामाजिक सुधारणेच्या बाबतींत सनातनी वृत्तीचा असे. परिस्थितिभेदानं जे चमत्कार घडतात त्यांतला हा एक आहे.

हें सारं सांगायचं प्रयोजन इतकंच कीं ज्या मी ' जादूगार ' कादंबरी{ पासून पुढें सतत सर्व प्रकारच्या सामाजिक सुधारणेचा निःशंक मनानं लेखनांत पुरस्कार केला, व सुशिक्षित स्त्रीचा कैवारच घेतला तो मी ' थेल्मा ' चं रूपातर करतांना अगदीं भिन्न वृत्तीचा होतो. त्या कादबरींत सुशिक्षित स्त्रीविषयीं सहानुभूतिऐवजीं जराशा कुत्सित वृत्तीनच मीं काहीं चित्र रंगविली. ती कादबरी आता कुणाला कधीं वाचायला मिळणार नाहीं याचं मला ज्या कारणांनी समाधान वाटतं त्यातल हे एक मोट कारण आहे.

गमत अशी, ज्या अच्युतरावानीं ती माझी कादबरी प्रसिद्ध केली ते स्वतः सनातनी मताचे मुळींच नव्हते. अनेक विख्यात समाजसुधारक कुटुबाशीं अच्युतराव भट यांचा अतिशय दृढ स्नेह होता. त्यामुळें माझ्या त्या रुपातरित कादबरीतल्या कित्येक प्रसगाची व विधानाची ते माझ्याशीं सभाषण करतांना चागलीच टर उडवीत. माझी स्वतःचीं त्या वेळचीं मतं निव्वळ सेकड हॅड होती, व त्यांचं समर्थन करण्यास लागणारी विचारांची खोली व ज्ञानसपन्नता माझ्या ठिकाणीं कुठून असणार ? त्यामुळें अच्युतराव भटांशीं वादविवाद करताना माझी सहज फजिती होई. ती झाली कीं अच्युतराव मनःपूर्वक हसत. मी आपल्या मनाशीं विचार करी, की याना माझीं मत इतकीं हास्यास्पद वाटतात तर मग माझ लेखन याना पसत कस पडत ? एके दिवशी अच्युतरावांनीं आपण होऊनच माझ्या या शकेच निरसन केलं. ते म्हणाले,

" तुमची लिहिण्याची धाटणी फार आकर्षक आहे. तुमचीं मतं कालपरत्वें बदलतील. कदाचित् आजच्याहून अगदीं निराळ्या मतांचा पुरस्कार तुम्ही करूं लागाल. ते कसंहि असो, जें लिहाल तं तुम्ही लोकांना वाचायला लावाल येवढं खास. "

त्यांचे ते शेवटचे शब्द मला फार आवडले, पण मी आपली मतं बदलीन असं त्यांनीं म्हणाव हें मला रुचल नाहीं. तारुण्याच्या प्रारंभीं मनाच्या काय विचित्र कल्पना असतात, पाहा !

' केरळकोकिळ ' मासिकात प्रसिद्ध झालेल्या पहिल्या गोष्टीचा मोबदला मी कशासाठीं खर्चिला तें वर सांगितलंच आहे. तो मला देताना अच्युतराव भटांनीं विचारलं होतं, " ही तुमची लेखनावर केलेली पहिली कमाई का ? "

आणि मीं " होय " म्हणून सांगितल्यावर ते म्हणाले होते, " लेखनावर जे कांहीं मिळवाल तें बॅकेंत ठेवा. " त्याप्रमाणें मी करीत गेलों, आणि माझे सुमारें ऐशी रुपये जेव्हा साठले तेव्हा ज्या बॅकेंत मीं ते ठेवले होते त्या ' बॉम्बे बॅक ' चं दिवाळं वाजलं ! कित्येकाचे चाळीस चाळीस, पन्नास पन्नास हजार रुपये बुडाले. पण त्याना. वाटलं नसेल इतकं मला वाईट वाटलं. लेखनावर मिळविलेले पैसे शिल्लक टाकण्यात अर्थ नाहीं असा मीं निश्चय केला !

दोन तीन वर्षे ' केरळकोकिळ ' मासिकांत मीं बरंच लेखन केलं. त्या मासिकाचा प्रसार बेताचाच होता. पण मला आपलं वाटे कीं नवोदित लेखक म्हणून पुष्कळच लोक मला ओळखीत असले पाहिजेत. मधेच कुणी तरी माझ्या तोंडावर सांगे कीं " तुम्ही लिहितां तें आम्ही वाचतों बरं कां. चांगलं लिहितां. " आणि मग आपल्या नांवाचा बराच बभ्रा झाला आहे ही माझी समजूत दृढ होई. उन्हाळ्यात वसंत व्याख्यानमालेंत कुणाचं वाङ्मयविषयक व्याख्यान असलं कीं ते ऐकायला जाणं कर्तव्यासारख वाटे. मनात येई आपण आतां लेखकवर्गात जमा झालों ना ! व्याख्यानाच्या ओघात 'उदयोन्मुख लेखक' असा शब्दप्रयोग वक्त्यान केला कीं, माझी समजूत होई मला उद्देशूनच तें भाषण चाललेल आहे. श्रोतृसमुदायाच्या पिछाडीच्या काठावर मी उभा राहिलेला असे. पण वाटे, ' उदयोन्मुख लेखक ' हे वक्त्याच्या तोंडचे शब्द ऐकल्याबरोबर आजूबाजूचे लोक माझ्याकडे पाहत असावेत. क्षणभर मला अगदीं गोंधळल्यासारख होई.

परंतु तो एकंदर प्रकार सुखाचा वाटे व मनांत येई, ' उदयोन्मुख लेखक ' येवढ्याच किताबावर आपण संतुष्ट राहायचं कीं काय ? मी अधिक उत्साहानं अन् परिश्रमांनीं लिहूं लागलों. पण तितक्यात अच्युतराव भटांनीं ' केरळकोकिळ' मासिकच आर्थिक कारणासाठीं बंद केल !

मला आतां प्रसिद्धीसाठीं दुसरा मार्ग पाहणं आवश्यक होतं !

## ३

वाङ्मयाची गोडी लागल्याकारणानं, आणि कॉलेजच्या पहिल्या व इटरच्या अशा दोन्ही परिक्षात इंग्रजींत पहिल्या प्रतीचे मार्क मिळाल्या-कारणानं बी. ए. च्या परीक्षेसाठीं भाषा विषय ऐच्छिक म्हणून घ्यावयाचा असं मीं मनाशीं योजलं होत. ज्याला भाषा विषय घेऊन बी. ए. त फर्स्ट क्लास यायचं असेल त्यानं डेक्कन कॉलेजातला विद्यार्थी व्हावं अशी समजूत आम्हां विद्यार्थ्यात त्या वेळीं प्रचलित होती. फर्ग्युसन कॉलेज सोडून डेक्कन कॉलेजांत जायच म्हटल्यास तिथल्या वसतिगृहात जाऊन राहण्याच्या खर्चाचा प्रश्न मला आधीं सोडविला पाहिजे होता. इंटरमीजिएटच्या परीक्षेत मला फारच चांगले मार्क मिळाले, व डेक्कन कॉलेजांत गेल्याम तिथली एक स्कॉलरशिप मला सहज मिळेल असा सभव उत्पन्न झाला. त्यामुळें खर्चाचा प्रश्न थोडासा सुटला. डेक्कन कॉलेजचे त्या वेळचे प्रिन्सिपल बेनसाहेब याना त्यांच्या बंगल्यावर जाऊन मी मुद्दाम भेटलों. बेनसाहेब फार विक्षिप्त म्हणून त्याची कीर्ति मीं ऐकली होती. त्याच्या बंगल्यावर जाऊन पोंचलों तो चार मैल सायकल मारीत गेल्यामुळें त्या श्रमानीं तर

मला धाप लागली होतीच; परंतु शिवाय या राक्षसाची व आपली मुलाखत आतां कशी काय होते या भीतीनं छाती अधिकच धडधडत होती.

बेनसाहेब आपल्या बंगल्याच्या अंगणवजा जागेतच मला दिसले. मी किंचित् पुढें जाऊन म्हटलं,

" I want to see you. "

आपले तेजस्वी निळसर डोळे माझ्याकडे लावून ते म्हणाले,

" Yes, as you see, you are seeing me. "

असं काहीं बोलून दुसऱ्याला भेवडाविण्याचा त्यांचा गमत्या स्वभाव मीं ऐकला होता. त्यामुळें मी न घाबरता माझं काम सांगितलं, व बेनसाहेबांना माझा धीटपणा पटला तेव्हां तेहि माझ्याशीं मग चांगलं बोलले. ' माझ्या कॉलेजांत अवश्य ये, मी तुला शिष्यवृत्ति देईन ' असं त्यांचं आश्वासन मिळवून मी परत आलो.

परंतु डेक्कन कॉलेजांत जाण्याचा माझा बेत वडिलांना पसंत पडेना म्हणून मला तो सोडून द्यावा लागला; आणि मग बी. ए.साठीं ऐच्छिक म्हणून भाषाविषयाऐवजीं मी तत्त्वज्ञान घेतलं. मला तत्त्वज्ञानाची विशेष आवड होती म्हणून मी हा बदल केला असं नव्हे. तत्त्वज्ञानाचं एकहि पुस्तक मी तोपर्यंत वाचलेलं नव्हतं. मग त्या विषयाची आवड असणं तर दूरच राह्यलं. असं असतां तो विषय मी निवडला याचं कारण इतकंच कीं, कॅलेंडर चाळतां चाळतां मला असं आढळून आलं कीं, त्या विषयांत पहिला नंबर मिळविणाराला ६०० रुपयांची स्कॉलरशिप मिळण्यासारखी होती. ही स्कॉलरशिप आपण मिळवूं अशी कां कुणास ठाऊक मनातल्या मनात मला खात्री वाटली, आणि तो विषय मी निवडला.

माझी ही निवड अखेर बरोबर ठरली. कारण बी. ए. च्या परीक्षेंत ती स्कॉलरशिप तर मी मिळविलीच; पण शिवाय एम्. ए. च्या परीक्षेत या विषयाचं 'सुवर्ण-पदक' मिळविण्याचा सन्मानहि मला संपादन करतां आला. पण ते असो. सांगावयाची मुख्य गोष्ट अशी कीं, भाषा विषय माझ्या खऱ्या आवडीचा असूनहि स्कॉलरशिपचा बहुमान मिळविण्याच्या लोभानं मी त्याच्याशीं एक प्रकारची बेइमानी केली.

मात्र, त्या वेळीं जरी मला तसं वाटलं तरी आतां असंच वाटतं कीं,

मीं तत्त्वज्ञान हा ऐच्छिक विषय घेतला हेंच चागलं झालं. दोन दृष्टींनीं. एक दृष्टि अशी कीं, गंभीर विषयाचं वाचन करण्याची यत्किंचितहि आवड माझ्या ठिकाणीं तोंपर्यंत नव्हती. नाटकं, कादम्बऱ्या मी अगदीं झपाट्यानं वाचून काढीत असे; पण गंभीर विषयावरील पुस्तकाच्या वाटेला मी कधीं जात नसे. मीं तत्त्वज्ञान विषय घेतला म्हणूनच माझ्यांतल हें वैगुण्य दूर झालं. आज तर स्वतःच्या अनुभवानं मी इतकंहि म्हणेन कीं, ज्याला लेखक आणि वक्ता व्हायचं असेल त्यानं बी. ए. च्या वेळीं ऐच्छिक विषयाचीं निवड करतांना तत्त्वज्ञानाची निवड करावी.

मी भाषाविषय घेतला नाही हें बरं झालं अस मी म्हणतों याचं दुसरं कारण असं कीं, तो घेतला असता तर इग्रजी व सस्कृत साहित्यांतल्या अनेक जुनाट भागांचा अभ्यास करण्याची उरस्फोड मला करावी लागली असती, व त्यामुळें माझ्या मनातल्या भाषाविषयक प्रेमाला कदाचित् पायबंदच बसला असता. पण हे सारे झाले आजचे विचार. प्रत्यक्ष त्या काळात तत्त्वज्ञान विषय घेतला तेव्हा माझ्या साहित्यविषयक अभिरुचीशीं मी इमान राखलं नाही असंच मला वाटलं. आणि म्हणून अभ्यासासाटीं नव्हे तर खासगी रीतीनं मी इंग्रजी ललितवाङ्मय अधिक प्रमाणांत वाचूं लागलों.

बी. ए. साठीं जीं इंग्रजी पुस्तकं अभ्यासक्रमात होतीं त्यांतलं मला सर्वांत आवडलेलं पुस्तक म्हणजे 'बेकन'चे 'निबंध.' या निबंधांचं मराठी भाषांतर करावंसं मला फार वाटे. परंतु त्यांच्या सूत्रबद्ध शैलीकडे पाहिलं कीं छाती होत नसे. पुढें एम्. ए. झाल्यानंतर मी त्यातल्या दहा-पंधरा निबंधाचं भाषांतर केलं व श्री. नेरूरकर याच्या संपादकत्वाखाली निघणाऱ्या एका छोटेखानी मासिकात (त्याचं नांव आतां पार विसरलो) ते मराठी निबंध प्रसिद्धहि झाले. परंतु बी. ए. च्या वर्गात असताना हें भाषांतर मला दुःसाध्य वाटे. त्यावेळीं जे लिखाण मीं केलं तें सुदैवानें आज माझ्या संग्रहीं नाहीं, त्यामुळें मी काय लिहिण्यात गुंतलो होतो तें मला सागता येत नाहीं. परंतु येवढं खास कीं मीं फार थोडं लिहिलं असल पाहिजे. कारण लेखनाऐवजी इतर गोष्टींचे छद मला लागले होते. त्यांतले मुख्य दोन म्हणजे क्रिकेट आणि वक्तृत्व.

बी. ए.च्या दुसऱ्या वर्षात कॉलेजच्या डिबेटिंग युनियनमध्यें इंग्रजी व

मराठी बोलण्याचा अगदीं सपाटा सुरू ठेवला. त्या वेळीं नुकत्याच उघडल्या गेलेल्या फर्ग्युसन कॉलेजच्या ॲफी-थिएटरमध्यें होणाऱ्या आमच्या सभाना सातसातशें आठ आठशें श्रोत्यांची गर्दी होत असे. कलकत्त्याकडे स्नेहलता नावाच्या मुलीनं हुड्यामुळें लग्न जमत नाही म्हणून स्वतःला जाळून घेतलं, तेव्हां हुड्याच्या निषेधासाठीं आमची जी सभा झाली त्या सभेतल्या माझ्या भाषणामुळें एक चांगला बोलणारा विद्यार्थी म्हणून पुण्यातले लोक मला ओळखू लागले.

माझ्या कोणत्या लेखाखालीं अगर गोष्टीखाली 'ना. सी. फडके, बी.ए.' अशी सही मी अभिमानानं प्रथम ठोकली ते मला आठवत नाही; परतु तस करण्यास मीं विलब लावला नसला पाहिजे हें उघड आहे. कारण मद गतीनं का होईना, माझ लेखन चालू होतं. लेखक म्हणून आपल्याला नांव मिळविता येईल अस मला वाटू लागल होतं. त्या वेळीं ज्या मराठी लेखकाचीं नाव विशेष गाजत होतीं त्यापैकीं अमक्या एखाद्यासारख व्हाव अगर अमक्याची लेखनशैली आत्मसात् करावी अस मला कधीच वाटल नाही. पण त्यातल्या त्यात नाटककार कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर याच्या नाटकांचा पगडा त्या काळात माझ्या मनावर विशेष होता. नाट्यरचनेंतील त्याचं कसब मला गडकऱ्याच्यापेक्षांहि श्रेष्ठ वाटे, हें तर याचं एक कारण होतंच, पण दुसरहि एक कारण होतं. तें थोडसं गंमतीचं आहे.

मी शाळेंतल्या सहाव्या सातव्या इयत्तेत होतों तेव्हां महाराष्ट्र नाटक मंडळीच्या 'कांचनगडाची मोहना' 'कीचकवध', 'भायकाचें बड' इत्यादि खाडिलकरकृत नाटकांचे प्रयोग पाहून रंगभूमीविषयीं मला इतकं जबरदस्त आकर्षण वाटू लागल होतं कीं, एकदा नाटक कंपनींत जाण्याचा बेत मीं केला होता. तो बेत सिद्धीस गेला असता तर माझं आयुष्य अर्थातच फारच वेगळ्या प्रकारचं झाल असतं. मात्र रंगभूमीच्या दारांत टाकण्यासाठीं उचललेलं माझं पाऊल जरी योगायोगानं परत फिरल, तरी माझ्या मनातली स्वभावसिद्ध नाट्यप्रीति नाहींशी अगर कमी झाली नाही. 'कांचनगडची मोहना' व 'कीचकवध' हीं नाटकं मला इतकीं आवडत असत कीं, त्यातलीं कित्येक भाषणं अभिनयासकट बसविण्यात मी आपल्या खोलीतल्या एकांताच्या कित्येक घटका आनदानं घालवीत असे.

अर्थात् या माझ्या आवडत्या नाटकाचे कर्ते जे खाडिलकर त्याच्याविषयीं मला अतिशय आदर, कुतुहल व आकर्षण वाटे. ते दिसायला कसे असतील याचं चित्र मी मनाशीं पुष्कळदा तयार करीत असे. तें करताना अर्थात्च त्याच्या नाटकांतल्या ज्या उत्कट, वीर, करुण व शृंगाररसात्मक भाषणानीं मला भुरळ घातली होती त्याचेच रंग मी वापरीत असे. माझ्या त्या कल्पनाचित्रातले खाडिलकर अतिशय तरतरीत नाकाडोळ्यांचे, पुष्ट परंतु सडसडीत बांध्याचे, ऐटबाज, मर्दानी आणि रंगेल मुद्रेचे होते. हें कल्पनाचित्र मीं दीर्घकाल मनाशीं ठेवल्यामुळें ज्या वेळीं खाडिलकराना मी प्रत्यक्ष पाहिलं त्या वेळेस एका मोठ्या प्रतिभावान् नावाजलेल्या लेखकास पाहिल्याच्या आनंदापेक्षा माझ्या कल्पनेंतलं रम्य चित्र पार धुतलं गेल्याचं दुःखच मला अधिक झाल. ‘ छे: हे कुठले खाडिलकर ? ’ असे अविश्वासाचे उद्गार माझ्या ओठावर आले. पण ते मी दाबले. कारण मी प्रत्यक्ष खाडिलकरांना पाहात होतों, हें मला अमान्य करता येईना. त्यांच्या बसण्याउठण्याच्या माडीच्या दारांतून मी डोकावत होतों, आणि ज्यानं मला तसं डोकावायला सांगितल तो खाडिलकरांचा सख्खा पुतण्या होता.

नाटककार खाडिलकराचा हा पुतण्या ‘ दादा ’ व मी शाळेंत एकत्र शिकत असल्यामुळें त्याच्या घरीं मी वारवार जाऊं येऊं लागल्यावर एके दिवशीं मी त्याला म्हटल, “ मला तुझे काका पाहायचे आहेत ” आणि मग योग्य संधि साधून त्यानं मला जिन्याच्या दाराशीं नेल व कानात हलकेंच सांगितलं, “ आत आमचे काका दिसतील तुला.” योग्य संधि साधून असं म्हटलं याचं कारण ‘ माझ्या एका मित्राला तुम्हांला पाहायचंय् ’ अस त्यानं काकाना सरळ म्हणावं व त्याच्याकडे मला घेऊन जावं हें शक्यच नव्हत. काकासाहेब खाडिलकराच्याविषयीं घरातल्या मंडळींना मोठा दरारा वाटे. अर्थात् त्याचं दर्शन मला घडविण्याच्या कामीं असा गनिमी कावा लढविण्याखेरीज दुसरा मार्ग नव्हता.

मात्र, हा गनिमी कावा आम्ही त्यानंतर आणखीहि कांही गोष्टींत वापरूं लागलों. श्री. खाडिलकर यांचा बहुतेक ठरलेला कार्यक्रम असे तों असा कीं, संध्याकाळीं लेखन आटपून सदाशिव पेठेंतल्या देशमुखांच्याकडे जायचं.

तिथें काहीं बड्या लोकाचा गप्पाचा अड्डा असे. बाहेर जाताना आपल्या लेखनाचे कागद कुठें कुलुपात बंदोबस्तात न ठेवता खोलीतच आपल्या गादीच्या बैठकीजवळच्या कारकुनी थाटाच्या बैठ्या उतरत्या टेबलावर ठेवण्याची त्याची रीत असे. त्याचं नवं नाटक जसजसं लिहिलं जाईल तसतसं वाचण्याची विलक्षण उत्कंठा मला आणि 'दादा' खाडिलकरला साहजिकच वाटे. ती तृप्त करण्यासाठीं आम्ही रोज सध्याकाळीं शत्रूच्या हालचालीवर अगदीं टपून पाळत ठेवूं लागलो, व शत्रु बाहेर पडताच त्याच्या बालेकिल्ल्यात घुसून नव्या नाटकातल्या पात्रांशीं सलगी करण्याचा पद्धतशीर कार्यक्रम आम्ही पार पाडूं लागलो. 'मानापमान' नाटक रंगभूमीवर येण्यापूर्वीच 'मी साफ सागतें मी येणार नाहीं' हें भामिनीच वाक्य आम्ही वाचून टाकलं होतं, 'हा टकमक पाही' इत्यादि पदांचे अन्वयार्थ लावण्याच्या खटपटी केल्या होत्या, 'अंगावरचे घ्या, पेटींतले घ्या' असली लक्ष्मीधराच्या तोंडची वाक्यं वाचून मनःपूत हसलों होतों, आणि ज्या प्रसंगीं रागाचं नाटक करणाऱ्या धैर्यधराला पंख्यान वारा घालतां घालतां भामिनी गोड गोड भाषण करते त्या प्रसगाची मजाहि आम्ही लुटली होती.

'कवि कृष्णां'च्या तयार होत असलेल्या नाटकाच्या हस्त-लिखितावर अशा प्रकारें दरोडा घालूनच आम्हीं थांबलों नाहीं. प्रत्यक्ष त्याच्याशीं भाषण करण्याची, इतकंच नव्हे तर त्याच्यापुढं उभं राहण्याचीं सुद्धां आमची छाती नव्हती, परंतु गनिमी काव्यान जी ही अप्रत्यक्ष सलगी आम्हीं सुरू केली तिच्यांत आम्हीं आणखी एक पाऊल पुढें टाकलं. त्याच्या नाटकाच्या वह्यांप्रमाणेंच त्यांच्या आणखी एका वस्तूवर त्याच्या न कळत मीं हात टाकूं लागलों.

ती वस्तु म्हणजे त्यांची बाजाची पेटी!

# ४

बी. ए. ची परीक्षा पास झाल्यावर संगीताचं शिक्षण घेण्याची बरेच दिवसाची इच्छा पूर्ण करण्याचं मी ठरवलं. याबाबत महिना एक रुपया खर्च करण्याची परवानगी मी वडिलापासून मिळविली आणि अबदुल करीमखासाहेबाच्या नूतन सगीत विद्यालयात नाव दाखल करून रोज सकाळीं पेटीवादनाचे धडे तास दीडतास घटवूं लागलों. ज्या संगीतानं पुढें माझ्या आयुष्यावर पुष्कळच परिणाम केला त्याच्याशीं हा माझा पहिला परिचय होता, व त्याला साजेशा अनावर उत्साहानं मी 'यमन,' 'भूप,' 'मुलतानी' इत्यादि रागांची आराधना सुरू केली. घरीं अभ्यास करायला माझी स्वत:ची पेटी नव्हती. नाटकांतल्या पदांच्या चाली स्वतः गळ्यांतून काढता आल्या तर शब्दरचना अधिक चांगली करता येईल अशा हिशेबानं खाडिलकरानीं गायन शिकण्यास आरंभ केला होता, व त्यासाठीं एक पेटी खरेदी केली होती. ही पेटी अगदीं अस्सल फ्रेंच बनावटीची व झारदार मंजुळ स्वरांची होती. तिच्यावर बोटं फिरवितांच मोठा आल्हाद वाटे. सकाळीं गायन क्लासात घेतलेल्या धड्यांची उजळणी करायला अशी मधुर

आवाजाची सुबक पेटी मिळण्यासारखी असल्यावर तो मोह टाळणं सोपं होतं काय ? खाडिलकर बाहेर गेले कीं त्याच्या नाटकाच्या वह्या अधीर चित्तानं वाचण्याप्रमाणेंच त्याच्या त्या पेटीवर हात टाकून नुकत्याच संपादन केलेल्या रागज्ञानानं माझ्या मित्रांना चकित करून सोडण्याचा कार्यक्रमहि मी नियमान पार पाडू लागलों. माझे मित्र मला म्हणत, "तुझी ती 'मुलवानी' अन् 'भूप' राहूं दे. काकाच्या नाटकातल एखादं पद वाजवून दाखीव" आणि मग 'मानापमान' नाटकातल्या अखेरच्या नाचाच्या वेळचं "किती मजेदार हार" हें पद मी पेटींतून काढल कीं त्याना वाटे, आहे बुवा, याला वाजविता येतं खर.

नाटककार खाडिलकरांच्या घरीं आमचं नित्य जाणं येण आहे असं मी लोकाना सागितल असतं तर तें काहीं खोटं वाटण्यासारख नव्हतं. परंतु, तस सागत सुटण्यासारखा माझा स्वभाव नव्हता. खाडिलकरांच्या घरीं मी जातों येतों हे केवळ श्लेपार्थानंच खरं म्हणता आलं असतं. त्या श्लेपाचा फायदा घेऊन लोकात बढाई मिरवावी अस मला कधीं वाटलं नाही. मी खाडिलकराच्या 'घरीं' जात येत असें हें खरं होत; परंतु तितकंच हेंहि खर होतं कीं, प्रत्यक्ष त्यांच्याशीं एक शब्दसुद्धा मी अजून बोललों नव्हतों. त्याच्या 'विद्याहरण' नाटकातील शुक्राचार्यांचीं भाषणंच्या भाषणं नाटक लागण्याच्या आधींच मी म्हणून दाखवूं शकलो असतों; परंतु, खाडिलकराचं व माझं प्रत्यक्ष असं भाषण एका शब्दानंहि झाल नव्हतं. माझ्यासारख्या नुकत्याच पदवीधर झालेल्या पोरसवद्या तरुणानं त्यांच्याशीं संभाषण करण्याचा प्रयत्न केला तर ते मोठ खुलून बोलतील अशी त्यांच्याकडे पाहिल्यावर कल्पनाच करतां येत नसे. इंग्रजींत ज्याला Forbidding म्हणतात तसा त्यांच्या चर्येवरचा अभिप्राय मला वाटे. कित्येकदां तर माझ्या मनांत अससुद्धा येई कीं, पोशाखात साधेपणाच नव्हे तर गबाळेपणा ठेवणारे, रस्त्यानं निघाले कीं छत्री वाकडीतिकडी धरून काहीं विचित्रच गतीनं चालणारे, किलकिल्या डोळ्यांचे, आणि उग्र चर्येचे हे खाडिलकर धैर्यधर–भामिनी, कच–देवयानी अशा प्रेमिकांचे विलक्षण नाजूक गुलगुलीत आणि प्रेक्षकांच्या चित्तवृत्ती नाचविणारे लाघवी संवाद लिहूं शकतात हें एक मोठं कोडंच समजलं पाहिजे. दुरून घुमे, गंभीर आणि उग्र वाटणारे

खाडिलकर बोलके झाले कीं रंगांत येऊन घटकाघटका कसे बोलत राहतात त्याचा अनुभव मला कधीं मिळेल असं मला वाटत नव्हतं. पण तो मला लवकरच मिळाला आणि त्याला कारण अस झाल कीं ' अल्ला हो अकबर ' ही माझी कादबरी लिहून झाल्यावर ती त्याना वाचून दाखविण्याची इच्छा दादातर्फे मी जेव्हा त्याच्या कानावर घातली तेव्हा ती त्यानीं ताबडतोब मान्य केली.

ही माझी पहिली कादबरी नव्हती. ' केरळकोकिळ ' मासिकांत मी कादंबरी लिहिली तिची हकीकत पूर्वी दिलीच आहे. शिवाय ' प्रभात ' नावाचं जे एक मासिक त्या सुमारास नव्यानं निघू लागलं होतं त्यात मी एक छोटीशी स्वतत्र कादबरी लिहिली होती. तिचं नांव ' कर्तव्य जागृति ' का असच काही तरी होतं. मला आतां तें नक्की स्मरत नाहीं. डोळे उघडण्याशीं त्या नांवाचा कांहीं तरी संबंध होता एवढंच आठवतं. परंतु, पुस्तकरूपानं प्रसिद्ध झालेली माझी पहिली कादबरी कोणती असं विचारल तर ' अल्ला हो अकबर ! ' असच म्हटलं पाहिजे. शिवाय, मागं ' प्रो. ' व पुढें ' एम्. ए. ' अशा थाटात माझं नाव छापलेलं मी प्रथम पाहिल तें या पुस्तकावरच !

या कादंबरीचं कथानक मला कसं सुचलं, व ती लिहीतांना मी कोणती दृष्टि ठेवली होती इत्यादि गोष्टींचा खुलासा मी कादबरीच्या प्रस्तावनेंत केला होता तो असा: " अकबराच्या राज्यपद्धतीचे निरनिराळ्या यवन व हिंदी लोकानीं भिन्न अर्थ कसे केले तें पाहणें मनोरंजक आहे. ही गोष्ट माझ्या मनांत पुष्कळ दिवस घोळत होती आणि अर्थभिन्नत्त्वाच्या पायावर एखाद्या चटकदार कादबरीचं कथानक रचता येईल अशी माझी खात्री होती. १९१४ साली बी. ए. झाल्यानंतर मला थोडासा रिकामा वेळ मिळू लागला व आतां नेहमीं मनांत घोळणारें कथानक कितपत जुळविता येतें तें पाहावें असा मी विचार केला, याच सुमारास ' मेरी कॉरेली ' ( खरा उच्चार ' मारी ' असा आहे, हें मला त्यावेळीं माहीत नव्हतं ) या ग्रंथकर्तीची Temporal Power ही कादंबरी मी वांचली व त्या कथानकांतील मध्यवर्ती कल्पना माझ्या कथानकांत उत्तम तऱ्हेनें गोवतां येईल असें मला वाटलें. या कादंबरींतील अकबर, सेलीम, बिरबल, मानसिंग व फाजल

यांखेरीज बाकीच्या सर्व व्यक्ती काल्पनिक आहेत. ही कादंबरी सामाजिक नसल्यामुळें तिला ऐतिहासिक म्हणणें प्राप्त आहे, परंतु अकबराच्या काळच्या चालीरीती, बोलण्याची पद्धति, दरबारांतील थाटमाट वगैरे गोष्टींचें चित्र रेखाटण्याचा माझा मुळींच प्रयत्न नाहीं. ऐतिहासिक कादंबऱ्याहून माझी कृति बऱ्याच अंशीं भिन्न आहे. उदाहरणार्थ, अकबर राजाचें राजा या नात्यानें वैभव किंवा ऐश्वर्य काय होतें त्याचें वर्णन या ग्रंथात कोठेंहि आढळणार नाही, किंवा काल्पनिक राणकदेवीचें ज्या ठिकाणीं इतर ग्रंथकार भपकेदार वर्णन करतील त्या ठिकाणीं एक साधी व्यक्ति या नात्यानें तिच्या मनःस्थितीचें मी वर्णन केलें आहे. ऐतिहासिक व्यक्तींना १९१७च्या सामाजिक स्त्रीपुरुषाचें स्वरूप देण्याचा मी प्रयत्न केला आहे. या प्रयत्नांत त्यांच्या ऐतिहासिक स्वरूपाचा भंग होऊं न देण्याचीहि खबरदारी मी घेतली आहे. ”

या कादंबरीचं हस्तलिखित खाडिलकरांना वाचून दाखवावसं वाटलं याला एक कारण होतं. ते आपल्या नाटकात कोणत्या तरी पौराणिक अगर ऐतिहासिक घटनेची आधुनिक दृष्टीनं संगति ( Interpretation ) लावतात असं मीं पाहिलं होत; आणि मला साहजिकच असं वाटत होतं कीं, अकबराच्या कारकीर्दीच ( Interpretation ) करण्याच्या हेतूनं लिहिलेली माझी कादंबरी त्यांना आवडेल.

ही माझी अपेक्षा खरी ठरली व “ दक्षिणा प्राइझ कमिटीकडे पुस्तक बक्षिसासाठीं अवश्य पाठवा ” असं आपण होऊन मला सांगण्याइतकी ती कादंबरी त्यांना पसंत पडली याबद्दल तर मला आनंद झालाच; पण मला अधिक आनंद झाला तो एखादीं कल्पना दुसऱ्याला फोडून सांगण्याच्या रंगात खाडिलकर आले कीं कसे बोलत सुटतात त्याचा अनुभव मला घेता आला म्हणून. एक साधा सुताच्या गुंड्याचा सदरा घालून ते आपल्या गादीवर बोडकेच बसलेले असत. त्यांच्या शेंडीचें केंस डोक्याला इकडे तिकडे चिकटून बसलेले मला दिसत. हातांनीं सुपारी कातरणं आणि तोंडातली पान तंबाकू चघळणं या त्यांच्या क्रिया सारख्या चालू असत. त्यांच्या किलकिल्या डोळ्यांची व चर्येची स्वाभाविक ठेवणच अंतर्मुख असल्याकारणानं माझ्या वाचनाकडे त्यांचं अगदीं पूर्ण लक्ष आहे अशी मला

समजूत करून घेतां येत असे. मधेच ते मला एखादा प्रश्न विचारीत, आणि माझ्या उत्तरासाठीं न थाबता आपल्या प्रश्नाचा अभिप्राय मला समजून सागण्यासाठी जें व्याख्यान सुरू करीत तें किती वेळ तरी चालू राही. एखाद्या कल्पनेचं अगदीं बारिक बारिक विश्लेषण करण्याचं त्यांचं सामर्थ्य खरोखरच असामान्य म्हटल पाहिजे. यापूर्वी त्याची जाहीर व्याख्यानं मीं ऐकली होतीं व त्याच्या वक्तृत्वातला हाच गुण मला प्रामुख्यानं आवडला होता; पण खाजगी संभाषणांतहि ते याच पद्धतीन बोलत राहत असतील अशी माझी कल्पना नव्हती. त्यामुळें त्याची तीं व्याख्यान मी अगदीं तन्मयतेनें ऐकत राहात असे. 'अल्ला हो अकबर' कादंबरीबद्दलची माझी सगळ्यांत आवडती आठवण म्हणजे खाडिलकराच्या या छोट्या व्याख्यानाची !

ही कादबरी लिहिण्याच्या वेळीं माझ्या मनावर कोणत्या गोष्टींचे विशेष संस्कार होते तें आता इतक्या वर्षानीं आठवून नक्की सागणं अशक्य आहे. परतु एक गोष्ट मात्र खचित कीं, एकीकडे मीं वाचलेल्या इंग्रजी कादं-बऱ्याची आधुनिक शैली आपल्या लिहिण्यात असावी असं ज्याप्रमाणें मला उत्कटतेनं वाटत होतं, त्याप्रमाणें हरीभाऊ आपट्यांच्या लेखनपद्धतीची छाया माझ्यावर नकळत पडलेली होती. हरीभाऊ आपट्यानीं आपल्या कादबऱ्यांत निवेदनाचं जें एक विशेष तंत्र रूढ करून टाकल होतं त्यातून बाहेर पडण्यासाठीं मी प्रयत्न केला तरी तो मला पुरता साधला नाहीं, आणि त्या तंत्राची छाप माझ्या लिहिण्यावर जागोजाग उठली हें ती माझी कादबरी थोडी चाळून पाहणाऱ्या वाचकांच्या सहज ध्यानात येण्यासारखं आहे. उदाहरणार्थ 'अल्ला हो अकबर!' च्या काहीं प्रकरणाचीं नावं पहा. "काजी आले" "रगेल सेलीम", "कानांत काय सागितलें ?" "चादणी चौक" "खून ! खून !" "काजीच्या तळघरात" इत्यादि मथळे हरीभाऊ आपट्याच्या कोणत्याहि कादबरींत शोभतील असे नाहींत काय ?—किवा ऋणाची मनमोकळी कबुली द्यायची म्हटल्यास हे सारे मथळे अस्सल हरीभाऊ आपटे थाटाचे नाहींत काय ? अवश्य आहेत; आणि या साम्याबद्दल मला विषाद बिलकुलच वाटत नाहीं. मराठी कादंबरीच्या क्षेत्रांत हरीभाऊ आपटे हे एक युगकर्ते होऊन गेले. माझ्या सारख्या त्या वेळीं नवीन असलेल्या लेखकाला त्यांची छाप एकदम

झुगारून देण्याची इच्छा अगर शक्ति असणं शक्य नव्हतं. एक राजवटी जाऊन दुसरीची स्थापना होताना पहिलीच्या छापाचं नाणं काहीं काळ वापरण्यात राहातंच ना? हरिभाऊ आपट्याच्या एखाद्या कादंबरींत शोभतील असे मथळे 'अल्ला हो अकबर' च्या काहीं प्रकरणाना मिळाले ते या न्यायानच.

मात्र, या माझ्या पहिल्या मोठ्या कादंबरींतहि मी लेखनशैलीचे कांहीं नवे प्रयोग करीत होतों. कादंबरीच्या भापेला व तंत्राला सुटसुटीतपणाचं, प्रवाहित्वाचं अन् आकर्षकतेचं नवं वळण द्यायची खटपट मी करीत होतों, असं चिकित्सक वाचकांना आज त्यानी ती कादंबरी वाचली तर कबूल करावं लागेल. माझी अशी समजूत आहे कीं, कादंबरीच्या तंत्राचा नीट अभ्यास करून तें वापरण्याचा हेतुपुरस्सर प्रयत्न जरी 'अल्ला हो अकबर' लिहिताना मीं केला नाहीं, तरी खाडिलकरांचीं नाटकं वाचून व पाहून नाटकाची रंगत साधण्यासाठीं खाडिलकर कोणत्या युक्त्या वापरतात याबद्दल मनाशीं जो विचार मी केला होता त्याचा परिणाम माझ्या लिहिण्यावर झाला असला पाहिजे. महाराष्ट्र नाटक मंडळींतील विख्यात नट केशवराव दाते हे पुढें कित्येक वर्षेपर्यंत मला जेव्हां जेव्हां भेटत तेव्हा या कादंबरीची तारीफ करीत, व तिचं एक सुंदर नाटक तयार करतां येईल असं म्हणत, याचं कारण हेंच असावं.

आजच्या माझ्या कादंबऱ्या उत्सुकतेनं वाचणारे काहीं वाचक ही माझी पहिली ( आणि ऐतिहासिक अशी अखेरचीच ! ) कादंबरी कोठून तरी मिळवून वाचतात व मला म्हणतात,

" तुमच्या शैलीचे जे खास विशेष आहेत त्यांची साक्ष या कादंबरींत स्पष्ट दिसते कीं ! " त्यांच्या या सागण्यांत सत्य किती आणि मला बरं वाटेलस बोलाव ही इच्छा किती तें ठरविण्याचा मी कधींच प्रयत्न केलेला नाहीं. 'अल्ला हो अकबर' माझ्या संग्रहीं आहे; परंतु ती पुन्हां एकदा वाचून पाहावी असं मला वाटलं नाहीं. आपल्या लहानपणाच्या फोटोत मोठेपणाची थोडी फार ओळख पटण्यासारखी असली तरी तो फ्रेम करून आपल्या बसायच्या जागीं लावावा असं आपल्याला थोडंच वाटतं ?

मात्र तें कसंहि असल तरी सुमारें चारशें पानांची ती कादंबरी लिहून

मी उदयोन्मुख लेखकवर्गांत आतां नक्की सामील झालों येवढं खरं. आणि त्या कादंबरीनं माझ्या मनांत एक निराळाच अभिमान उत्पन्न केला. मला मनातल्या मनांत वाटे, कॉलेजातले प्रोफेसर पुष्कळ आहेत, पण कादंबऱ्या लिहिणारा प्रोफेसर मीच एकटा. या अभिमानाच्या विचारा-पुढें ज्या एका गोष्टीची वास्तविक मला लाज वाटावी तिचं मला कांहींच महत्त्व वाटत नसे. ती गोष्ट म्हणजे या चारशें पानाच्या कादंबरीबद्दल मला मिळालेला क्षुद्र मोबदला !

प्रकाशकमहाशयांनीं मला अवघे पन्नास रुपये देऊन ही कादंबरी जवळ जवळ फुकटांत पाडली होती ! आणि त्याच्या भरीला त्या वेळच्या माझ्या अज्ञानाचा फायदा घेऊन ' सर्व हक्क प्रकाशकाचे स्वाधीन ' असं एका कंसांत पुस्तकावर छापून टाकलं होतं !

माझा हा ' कंसवध ' पुढें माझ्या लक्षात आला ! पण मग त्या गोष्टीवर कांहीं उपाय राहिला नव्हता.

# ५

जवळजवळ चारशें पानाची कादंबरी अवघ्या पन्नास रुपयांचा मोबदला देऊन माझ्याकडून लाटणाऱ्या प्रकाशकाना ' बरा आहे हा लेखक कायमचा आपल्या जाळ्यांत अडकविता आला तर ' अस माझ्याविषयीं वाटलं असल्यास नवल नाहीं. ' अल्ला हो अकबर ' कादंबरीचा जेव्हां बऱ्यापैकीं बोलबाला झाला, आणि किफायतहि चांगली झाली (मला नव्हे) तेव्हां ते प्रकाशक माझ्याकडे वारंवार येऊं लागले. असे ते आले कीं, माझ्या लेखनशैलीची तें फार तारीफ करीत, व मला बनविण्याइतकी प्रशंसेची पेरणी झाली असं त्यांना वाटलं, कीं ते म्हणत, " आतां दुसरी कादंबरी केव्हा देता आम्हाला, बोला. " त्यांच्या मारवाडी व्यापाराचे डाव-पेच आतां माझ्या ध्यानात आले होते. त्यामुळें त्याच्या त्या प्रश्नाला मी उत्तर देई, " सध्या काहीं कथानकच सुचत नाहीं हो ! "

ते म्हणत, " वा ! असं कुठं झालंय् ? "

" चेष्टा नाहीं. खरंच कांहीं सुचत नाहीं. "

" बरं, पण सुचलं कीं आमच्यासाठींच लिहायचं बरं का ! "

" वाः ! हें काय सांगायला पाहिजे ? "

" मग मी हें नक्की समजूं ना ? "

" अगदीं नक्की. "

माझा तो निर्वाळा ऐकल्यावर ते आपली छत्री उचलून खांद्यावर टाकीत आणि माझ्या खोलीच्या जिन्याकडे वळत.

असे दहापांच प्रसंग झाल्यावर मात्र माझ्या खऱ्या हेतूचा त्या प्रकाशकाच्या मनात प्रकाश पडला असावा. त्यानी माझा नाद सोडला अन् माझ्याकडे येण्याचं बंद केलं.

मात्र कथानक सुचत नाहीं असं जे मीं त्यांना सांगत असे तें कांहीं अगदींच खोटं नव्हतं. 'अल्ला हो अकबर' ही माझी कादंबरी १९१७ च्या उन्हाळ्यात प्रसिद्ध झाली. त्यानंतर 'कुलाब्याची दांडी' ही कादंबरी १९२२ साली मी लिहिली. 'दादाभाई नौरोजी' यांचं चरित्र हें 'अल्ला हो अकबर' नंतरचं माझं दुसरं पुस्तक. पण तेंसुद्धा मी १९२० सालीं लिहिलं. म्हणजे 'अल्ला हो अकबर' प्रसिद्ध झाल्यानंतर जवळ जवळ तीन वर्षांच्या काळांत मी स्फुट लेखनावरच संतुष्ट राहिलों असं दिसतं. असलं लेखन मात्र मी बऱ्याच मोठ्या प्रमाणावर केलं, आणि तें मुख्यत्वें-करून 'मनोरंजन,' 'प्रभात' आणि 'अरविंद' या तीन मासिकांतून प्रसिद्ध झालं.

'मनोरंजन'चे विख्यात कुशल संपादक काशीनाथ रघुनाथ मित्र यांच्या कारकीर्दीच्या अगदीं अखेरीस माझा त्या मासिकाशीं संबंध आला. मी 'मनोरंजन'मध्यें लिहूं लागलों, परंतु माझा व 'मनोरंजन'चा जिव्हाळ्याचा संबंध उत्पन्न झाला नाहीं. 'अरविंद' मासिक मुंबईच्या एका उत्साही, साहित्यप्रेमी अशा अल्पवयीं तरुणानं काढलं होतं. हा तरुण म्हणजे दुसरं कोणी नसून आज मराठी साहित्याच्या क्षेत्रांत कळकळीनं काम करणारी जबाबदार हौशी व्यक्ती म्हणून सर्वत्र ओळखले जाणारे डॉ. भालेराव होत. त्याचं 'अरविंद' मासिक मला आवडलं होतं. त्याच्याशीं माझे अधिक निकट संबंध कदाचित् जडले असते, परंतु तें थोड्याच दिवसांत बंद झालं. 'प्रभात' मासिक मात्र बरेच दिवस तग धरून राहिलं. टीका, गोष्टी, निबंध असं माझं पुष्कळच लेखन त्यांत प्रसिद्ध झालं; आणि तें

काढणाऱ्या गृहस्थाशीं माझा जो संबंध आला त्याचा माझ्या पुढच्या साहित्यविषयक आयुष्यावर बराच परिणाम झाला.

या गृहस्थाना मी प्रत्यक्ष भेटलों तो 'प्रभात' मासिकांत लिहूं लागल्यानंतर काहीं दिवसांनीं. यानीं आपल्या मासिकाची कचेरी खेतवाडींतल्या एका इमारतींत ठेवली होती. तिथला थाट पाहून मी थक्कच झालो, आणि स्वतः सपादकाची ऐट पाहून तर त्याहिपेक्षां. त्या गृहस्थाच्या कचेंरींतल तें वेचक सजावट सामान, त्याच्या अंगावरचा भारी किमतीचा सूट, आणि तोंडातली एक सिगारेट सरली कीं दुसरी पेटविल्याशिवाय न बोलण्याची त्याची प्रतिज्ञा—हें दृश्य एका नवीनच निघालेल्या मासिकाच्या संपादकाला भेटायला गेलों असताना मला दिसेल अशी माझी कल्पना नव्हती. या गृहस्थांचं नांव केसरीनाथ धुमे. वर्णानं काळे, पण नाकाडोळयानीं नीटस, भक्कम बांध्याचे आणि श. वा. किर्लोस्करांच्याहून देखील अधिक उंच अशी ही धुम्यांची स्वारी होती.

या गृहस्थांचा व माझा परिचय पुढें वाढत गेल्यावर मला कळलं कीं मुंबईच्या प्रसिद्ध डिकिन्सन ॲंड को. या कागदाच्या कंपनींत त्यांना चांगल्या पगाराची नोकरी होती. त्यांनीं ती सोडली, का तिनं त्यांना सोडलं हें मला कळलं नाहीं- त्या वेळींहि नाहीं आणि पुढेंहि कधीं नाहीं. दुसऱ्या माणसाच्या असल्या हकीगती आपोआप जेवढ्या कळतील त्यापलीकडे चौकशी करण्याची वृत्ति माझ्या स्वभावांतच नाहीं. मला इतकी माहिती पुरेशी वाटली कीं, धुमे हौसेखातर मासिकाचा उद्योग करून पाहात आहेत. मी त्यांना शक्य तितकं लेखनसाहाय्य करायचं ठरविल. या निश्चयाप्रमाणें मी तें मासिक बंद होईपर्यंत वागलों. कितीदा तरी असं होई कीं, धुम्यांकडून माझें शेंपन्नास रुपये यायचे थकलेले असत; पण तें लक्षात न घेतां मी त्यांना सर्वतोपरी साहाय्य करीत असे. मला आता नक्की सन अगर महिना आठवत नाहीं; पण मला वाटतं १९१९ सालीं 'प्रभात' मासिकाचा जो खूप मोठा खास 'स्वराज्य अंक' निघाला त्यासाठीं जितकी धुम्यानीं स्वतः तितकीच मीहि खटपट केली. आणि याचं कारण इतकंच कीं, वाढत्या परिचयाबरोबर या गृहस्थाचे दोष मला दिसले, त्याचप्रमाणें त्याच्या अंगचे गुणहि मीं डोळयानीं पाहिले !

‘प्रभात’ मासिकाची भरभराट कधींच झाली नाहीं. मासिकाच्या पैशाच्या व्यवहाराची अगर हिशेबाची मला माहिती नव्हती; पण माझी कल्पना अशी कीं, तें मासिक बुडालं याला कारणं दोन. एक धुम्यांचा बिनहिशोबी कारभार; आणि दुसरं त्याचा व्यसनीपणा. परंतु त्यांचे दुर्गुणहि दृष्टीआड करण्यासारखे वाटावे असा एक अमोलिक गुण त्याच्या ठिकाणीं होता, व त्यामुळेंच ‘प्रभात’ विषयीं मला आत्मीयता धरावीशी वाटे. तो गुण म्हणजे त्यांची विलक्षण चिकाटी, आणि जरूर तर शारीरिक कष्टसुद्धां करण्याची तयारी. मला पक्कं आठवतं कीं, प्रभातच्या अखेरअखेरच्या दिवसांत मासिकाच्या मजकुराचा ‘कपोज’ तेवढा कंपॉझिटरकडन करून घेऊन छपाईचं काम स्वतः करण्यासाठीं एक मळकट धोतर नेसून आणि फाटका गजिफ्रॉक घालून धुमे तासन् तास ट्रेडलवर पाय मारीत उभे राहात असत! त्याना काय एखादी नोकरी मिळणं दुरापास्त होत? त्यांचे वशिले पुष्कळ होते. ते मुंबईतच जन्मलेले व मुंबईत अगदीं पक्के मुरलेले होते. दुसरा एखादा उद्योग करून त्याना शेदीडशे रुपये सहज मिळवितां आले असते. परंतु, असं असूनहि अखेर अगदीं गळयाला तात लागेपर्यंत त्यानीं ‘प्रभात’ चालविलं. खास ‘स्वराज्य अंक’ आम्ही काढला तो तर असा नमुनेदार कीं कांहीं विच्चारू नका. त्यावेळीं राजकारणात गाजलेलीं टिळक, गांधी, टागोरापासून तों दा. वि. गोखले, बामणगांवकरापर्यंत झाडून सारीं नावं त्या खास अंकाच्या अनुक्रमणिकेत होतीं. अंकाची तयारी करतांना मी एकदा थट्टेन धुम्यांना म्हटलं, “अमेरिकेच्या प्रेसिडेंटचा सदेश आपण कां आणू नये आपल्या अंकासाठीं?”

आणि तें ऐकतांच तो गृहस्थ खरोखरच ‘केब्ल’ करायला निघाला होता!

त्याचा उत्साह, धडाडी आणि कष्ट करण्याची ताकद खरोखरच अपूर्व होती. आणि म्हणून त्याचे दुर्गुण मला दिसत नसत. माझे किती पैसे बुडतात याचा कधींहि विचार न करतां मी ‘प्रभात’ मासिकांत नुसतं लेखनच केलं नाहीं, तर तें आपल समजून मी त्या मासिकासाठीं खपलों.

आणि पुढें चार वर्षानीं मी मुंबईत राहावयास आल्यावर धुमे जेव्हां पुन्हां माझ्याकडे आले व सहकार्य मागूं लागले तेव्हाहि त्याच्या खटपटी

स्वभावाबद्दल आणि दिलदारपणाबद्दल माझा पूर्वींचा अनुकूल ग्रह असल्यामुळें मी त्याच्या विनंतीला रुकार दिला. ही त्यांची विनति कोणती होती तें आता सागत नाहीं. एक स्वतंत्र मनोरंजक प्रकरण आहे तें.

१९१७--१९१९ या काळात माझं जे लेखन प्रसिद्ध झालं, त्यांतील टीकालेखांनींच लोकाचं लक्ष माझ्याकडे अधिक वेधल असलं पाहिजे. पण माझ्या या टीकाची गंमत अशी कीं, प्रोफेसर वा. म. जोशाच्या 'रागिणी' वरील माझा लेख सोडला तर बाकी सारे लेख नाटकावरचे होते. पुढें माझं लक्ष कादंबरी--लेखनाकडे वळेल असं सूचित करणारा एकहि लेख त्या काळात मीं लिहिला नाहीं. याचं कारण बहुधा हें असल पाहिजे कीं ते दिवस मराठी रंगभूमीनं भरभराटीचा जो कळस गांठला त्याचे होते. प्रतिवर्षी गद्यपद्य मिळून दहापधरा नवीं नाटकं रगभूमीवर येत होतीं. ज्याला लोकप्रियतेचं वलय(Glamour)म्हणता येईल तें आघाडीच्या नाटककाराच्या भोंवतीं होत. आज मराठी साहित्यात कादंबरीनं मानाच अगदीं पहिलं स्थान मिळविलं आहे. त्यावेळीं अशी स्थिति नव्हती. कादंबऱ्या आणि कादंबरीकार याकडे वाचकाचं लक्ष नव्हतं. हरिभाऊ आपट्यानीं लेखणीच जवळजवळ विसर्जन केल होतं. श्रीयुत गुर्जर, नारायण हरी आपटे व महाराष्ट्र कुटंबमालेंतून लिहिणारे त्या मालेचे संस्थापक 'सहकारी कृष्ण' यानीं चागल्यापैकीं कादबरीलेखन चालू ठेवलं होतं खरं. परतु एक तर कादंबऱ्या वाचण्याच्या लहरींत (Mood मध्यें) महाराष्ट्र नव्हता; आणि वाचकाच्या चित्तवृत्ती जिंकून कादंबरीकडे वळवील असा कुणी नवा लेखक आढळत नव्हता. या परिस्थितीचा परिणाम माझ्यावर झाल्यामुळें कोल्हटकर, खाडिलकर, गडकरी या नाटककाराभोंवतींच माझी टीकादृष्टि त्यावेळीं खेळत राहिली असली पाहिजे.

वास्तविक हरिभाऊ आपट्याशीं माझा आतां प्रत्यक्ष परिचय झाला होता. पहिल्यापासून टिळकांच्याविषयीं माझ्या मनात कमालीचा आदर होता. आणि मवाळ राजकारण करणारे नामदार गोखले यांच्याविषयीं व त्यांच्या पंथातील हरिभाऊ आपटे याच्याविषयीं प्रतिकूल ग्रहाचं जें विष मेळ्यांतल्या पदातून आणि 'हिंदु पंच' नांवाचं जें एक विनोदी पत्र त्या वेळीं निघत असे त्यातल्या व इतर वृत्तपत्रीय साहित्यांतून तरुण पिढीच्या मनांत

भिनविलं जात होतं त्याची बाधा मलाहि थोडी फार झाली होती. म्हणजे हरिभाऊंच्याबद्दल कादंबरीकार या नात्यानं मला वाटणारा आदर निर्भेळ नव्हता. टिळकाचे एक विरोधक म्हणून त्याच्याविषयीं माझं मत काहींसं पूर्वग्रहदूषित होतं. परंतु त्याच्याशीं माझा जेव्हां परिचय झाला व वाढत गेला तेव्हा मला ते पहिल्यापासूनच इतके आवडूं लागले कीं, त्याच्या-विषयीं आपल्या मनांत कधीं काळीं विरोधाची भावना असावी याची मला मनःपूर्वक शरम वाटे. माझं दुर्दैव असं कीं, त्याच्याशीं माझा परिचय दृढ होईल अशीं चिन्हं दिसूं लागायला अन् त्यांचं देहावसान व्हायला एकच गांठ पडली. १९२७ सालीं माझी ' जादूगार ' कादंबरी गाजली त्या वेळीं मनातल्या मनात ज्या विचारानं मी कष्टी झालो तो असा कीं, ज्याची शाबासकीची थाप मिळविण्यांत मला सगळयात अधिक धन्यता वाटली असती ते हरिभाऊ आपटे आज हयात नाहींत !

हरिभाऊचा व माझा परिचय घडून यायला व वाढायला जें कारण झालं त्याचा माझ्या लेखनाशीं कांहीच संबध नव्हता. १९१६ सालीं शिक्षणप्रसारक मंडळीचं नवं कॉलेज ( आता सर परशुरामभाऊ कॉलेज या नांवानं ओळखलं जाणारं ) निघालं तें माझे स्नेही प्रो. घारपुरे यांच्या खटपटीनं. त्यांच्या अविश्रान्त खटपटीला हरिभाऊ आपट्यांच्या मोटमोठ्या लोकात ज्या ओळखी होत्या त्यांची मोठीच मदत झाली होती. नव्या कॉलेजचे एक जिव्हाळ्याचे ऋणानुबंधीच नव्हे तर प्रतिपालक अशा भावनेनं आजन्म सेवा करण्यासाटीं कालेजात दाखल झालेला तरुण अध्यापक वर्ग हरिभाऊकडे पाहत असे. या अध्यापकांपैकीं मी एक होतों. एम्. ए. च्या परीक्षेचा अभ्यास करीत असनानाच मी या नव्या कॉलेजांत शिकवूं लागलो होतों, आणि एम्. ए. होताच मी पक्का प्रोफेसर व आजन्म सेवक झालो. माझा व हरिभाऊ आपट्याचा विशेष संबंध आला तो यामुळें. त्या वेळच्या साहित्यिकांत त्याचं स्थान अग्रगण्य होतं, आणि लेखक होण्याच्या मार्गाला मी निश्चितपणें लागलों होतो, तरी देखील त्याच्याशीं साहित्यविषयक गप्पा मारण्याचं धाडस मला कधीं झालं नाहीं. मला वाटे, किती झालं तरी मी एवढासा पोर.

या सुमारास मी सारा तेवीस वर्षांचा होतों. माझ्याकडे पाहून हा

कॉलेजातील एखादा विद्यार्थी असेल असंच तिऱ्हाइताला वाटण्यासारखं होतं. कुणी परक्यानं विचारलं तर त्याची गंमत करण्यासाठीं मी तसं सांगतहि असे. या माझ्या खोडकरपणाचा प्रयोग एका गृहस्थावर मीं केला, आणि पुढें ते गृहस्थ मला हरिभाऊ आपट्यांच्या घरीं भेटले तेव्हां जी गंमत झाली ती मला अजून आठवते.

त्या दिवसात उन्हाळ्याच्या मोसमात मी महाबळेश्वरला जात असे. पुष्कळदां सध्याकाळच्या वेळीं मी तिथल्या जिमखान्याच्या खालच्या बाजूच्या मैदानावर जाऊन बसत असे. एक चांगला सूट घातलेले म्हातारे गृहस्थ नेमानं तिथे यायचे, आणि एका ठरलेल्या बाकावर पुष्कळ वेळ बसायचे. एके दिवशीं मी मुद्दामच त्याच्या आधीं जाऊन त्याच्या त्या ठरलेल्या बाकावर जाऊन बसलो. ते आपल्या ठरीव वेळेला आले. मी मुद्दामच बसून राहिलो. मला उठायला त्याना कसं सांगतां येईल? ते नाइलाजानं बाकावर बसले. चारपाच मिनिट त्यानीं दक्षिणेकडे, तर मी उत्तरेकडे दृष्टि लावली. हा वात्रटपणा पुरे झाला असं मनात येऊन मी उठायच्या बेतात होतों. पण तितक्यांत त्यानीं मान वळवून माझ्याशीं भापण सुरू केलं :

"आज फार उकडलं नाहीं?" ते म्हणाले.

"हो, फार."

"कुठें पुण्यास असतां काय?" त्यांनीं विचारलं.

"होय."

"कॉलेजांत?—असं का?—कोणत्या?"

"न्यू पूना कॉलेजांत."

"कोणता क्लास?"

"इंटरमीजिएट."

"विपय?"

"लॉजिक."

ते काहीं वेळ गप्प राहिले आणि मग सूर्यास्ताच्या शोभेकडे माझं लक्ष वेधून तशी शोभा ज्यांत वर्णिली आहे अशा इंग्रजी कविता मला ते मोठ्या तन्मयतेनें म्हणून दाखवूं लागले. त्यांचा इंग्रजी काव्याचा अभ्यास चांगला असावा.

यानंतर तीनचार वेळा या गृहस्थांची व माझी त्या बाकावर गांठ पडली. पडली म्हणजे पडेल अशी योजना मी केली. आणि प्रत्येक वेळीं त्यांनीं मला इंग्रजी गद्यपद्यांतले उतारे म्हणून दाखविले. तन्मयतेनं ऐकणाऱ्या श्रोत्याची भूमिका मी चांगली वठविली आणि ती त्यांना फार आवडली. मात्र त्यांनीं माझं नाव विचारलं नाहीं, व ते कोण याची चौकशी मींहि केली नाहीं.

पुढें पावसाच्या पहिल्या सरी आल्या तेव्हा महाबळेश्वर हाललं. पुण्यास गेल्यावर एके दिवशीं काहीं कामासाठीं मी हरिभाऊ आपट्याच्या घरीं गेलों. पाहतो तो इंग्रजी काव्य मोठ्या भक्तीनं म्हणून दाखवणारे महाबळे-श्वरचे ते वृद्ध गृहस्थ त्यांच्या शेजारींच बसले होते. मी त्यांना नमस्कार करणार होतो तोंच हरिभाऊ मला म्हणाले.

"याची ओळख करून देतों. हे मुंबईचे जस्टिस राव."

आणि माझ्याकडे हात करून ते त्यांना म्हणाले, "हे फडके. आमच्या न्यू पूना कॉलेजमधील सर्वांत तरुण प्रोफेसर आहेत हे."

जस्टिस राव माझ्याकडे आचंब्यानं पाहूं लागले; व तसं पाहण्याचं कारण हरिभाऊंनीं विचारतांच ते म्हणाले,

"मोठे खोडकर आणि विनोदी दिसतात तुमचे हे फडके! यांनीं मला चांगलंच ठकवलं कीं"

हरिभाऊंनीं हंसत विचारलं, "तें कसं काय?"

"आपण विद्यार्थी आहांत असं यांनीं सांगितलं मला."

मी नम्रपणानं पण हंसत चटकन् म्हटलं, "असं मी मुळींच सांगितलं नाहीं आपल्याला. आपली प्रश्नोत्तरं काय झालीं तीं मला पक्कीं आठवतात. आपण विचारलंत, पुण्यास असतां काय? मी म्हटलं, होय. 'कोणत्या कॉलेजांत?' 'न्यू पूना कॉलेजात' 'कोणता क्लास?' 'इंटरमीजिएट', 'विषय?' 'लॉजिक.' आतां यातलं माझं एक तरी उत्तर खोटं आहे का आपण सांगा."

ते दोघेहि मोठमोठ्यांदा हसूं लागले

# ६

१९१९ सालीं मुंबई विश्वविद्यालयानं दादाभाई नौरोजी. याच्या मराठी चरित्रास दोनशें रुपयाचं बक्षीस जाहीर केलं. स्वतःची लेखनशक्ति कसाला लावून पाहण्याच्या अवस्थेंत मी त्या वेळीं असल्यामुळें पारितोषिकाची ती जाहिरात माझ्या वाचनात आली तेव्हां तालमींत कुस्तीची तयारी करणाऱ्या जवानाला एखाद्या जंगी मैदानातल्या खुल्या बक्षिसाची बातमी कळल्यावर वाटावं तसं मला वाटलं. ' पाहूं या आपल्याला हें बक्षीस मिळविता येतं का ' असं मी मनाशीं म्हटलं. केवळ माझ्या लेखनचातुर्याच्या जोरावर मला तें बक्षीस मिळविता यावं असा त्याचा विषय नव्हता. कारण चरित्र लिहावयाचं होतं, कादंबरी नव्हे. आणि चरित्रलेखनांत लेखनशैलीचं महत्त्व पंचवीस टक्के तर चरित्रविषयक माहितीचं महत्त्व पंचाहत्तर टक्के, ही गोष्ट मला विसरता येण्यासारखी नव्हती. परंतु ही माझी अडचण दूर व्हावी असे योगायोग जमून आले.

न्यू पूना कॉलेजचा मी तहाहयात सेवक होतो. कॉलेजसाठीं फंड गोळा करण्याचं काम मी प्रमुखपणानं करीत असे, व या कामाच्या निमित्तानं

अल्पावधींत पुष्कळ मोठमोठ्या लोकाशीं माझ्या ओळखी झालेल्या होत्या. सर जमशेटजी जिजीभाई यांच्या धर्मादाय फंडातून कॉलेजसाटीं बरीच मोठी देणगी ( मला आतां नक्की आंकडा आटवत नाही; परंतु निदान वीस हजाराची तरी असावी ) मी स्वतःच्या एकट्याच्या हिकमतीन आणि खट-पटीनं मिळविली होती. ही खटपट करीत असतां सर होमसजी वाडिया याची माझी पुष्कळच दाट ओळख झाली होती. हे गृहस्थ दादाभाई नौरोजीच्या सहवासात राहिलेले होते, व दादाभाईंच पुष्कळच चरित्र त्याच्या डोळयादेखत घडलेलं होतं. चरित्र लिहिण्याचा माझा हेतु ऐकतांच त्याना फार आनंद झाला, आणि चरित्रविषयक माहिती पुरविण्याचं त्यानीं कबूल केलं. हें आपल वचन त्यानीं इतक्या हौसेन पाळल कीं, माझ्या चरित्राला तें सर्वोत्कृष्ट ठरून विश्वविद्यालयाकडून बक्षीस मिळालं याच एकचतुर्थांशच श्रेय स्वतःच्या लिहिण्याकडे ठेवून बाकीचं सारं त्याना द्यायला मला सकोच वाटायचा नाही.

मला बक्षीसाचे दोनशें रुपये मिळाले तेवढ्यांत तें चरित्र छापून मी पुस्तकरूपानं प्रसिद्ध केल. त्या वेळीं पुण्याच्या छापखान्यांत गोंधळेकरांचा ' जगद्धितेच्छु ' छापखाना विशेष चागला समजला जात असे. या छाप-खान्यात माझ्या वडिलाचा ' वेदान्तनिदर्शन ' हा अतिशय नाणावलेला ग्रंथ आम्हीं छापून घेतला होता. अर्थात् ' दादाभाई नौरोजी ' हें पुस्तकहि त्याच छापखान्यात मी छपाईसाठी द्यावं हें साहजिक होतं. या पुस्तकाच्या कामाच्या निमित्तानं माझी ज्या एका समवयस्क तरुण गृहस्थाशीं नव्यानं ओळख झाली त्यांचा या ठिकाणीं विशेष उल्लेख केला पाहिजे. कारग त्याच्याशीं झालेल्या या परिचयाचच पर्यवसान पुढें सहा वर्षांनंतर त्यानीं व मीं मिळून ' रत्नाकर ' मासिक काढण्यात झाल.

या गृहस्थांचं नाव अनत सखाराम गोखले. ' दादाभाई नौरोजी ' पुस्तक छापल गेल तेव्हां हे ' जगद्धितेच्छु ' छापखान्याचे मॅनेजर होते. अतिशय कल्पक व कष्टाळू म्हणून त्यांचा लौकिक होता. साध्या कंपॉ-झिटरच्या कामापासून नोकरीस आरंभ करून ते आता मॅनेजर झाले होते. गोंधळेकरांचा ते केवळ उजवा हात होते. माझ्या पुस्तकाची छपाई चालू असता ते पुष्कळदां माझ्याकडे येत, व 'मनोरंजन' मासिकापेक्षा निराळ्या

स्वरूपाचं, राष्ट्रीय धोरणाचं ' मॉडर्न रिव्ह्यू ' च्या धर्तीवर एक नवीन मराठी मासिक काढण्याबद्दल आमचीं बोलणीं वारंवार होत. परंतु आमचे हे बेत त्यावेळीं केवळ बोलण्यातच राहिले.

माझ्या ' दादाभाई नौरोजी ' च्या आतापर्यंत तीन आवृत्ती निघून खलास झाल्यामुळें त्याच्या अगदीं पहिल्या आवृत्तीची प्रत कुठें आढळेल कीं नाहीं शंका आहे. माझ्या देखील संग्रहीं ती नाहीं. परंतु एखाद्यानं ती प्रयत्नानं मिळविली तर त्या पुस्तकाच्या पाठीवर त्याला " प्रो. ना. सी. फडकेकृत लोकमान्य टिळकाचें चरित्र लवकरच प्रसिद्ध होईल " अशी जाहिरात दिसेल. माझ्या ' दादाभाई नौरोजी 'च्या चरित्रावर जेव्हां सर्व वृत्तपत्रातून उत्कृष्ट अभिप्राय आले तेव्हां एके दिवशीं हें आपल पुस्तक टिळकांना दाखवाव अस माझ्या मनात आल. त्याप्रमाणें मी पुस्तकाची एक प्रत घेऊन त्याच्याकडे गेलो. त्याची अशा प्रकारे समक्ष भेट घेण्याची ही माझी पहिलीच वेळ होती. मी पुढें ठेवलेलं पुस्तक उचलून घेऊन आपल्या नेहमीच्या सवयीप्रमाणें एक डोळा अतिशय किलकिला करून तोडातली सुपारी चघळीत त्यानीं माझ्यासमक्ष प्रथम पुस्तक चाळून पाहिल आणि नतर त्यातील कांहीं भाग सावकाश वाचला.

मला मनातल्या मनात सारखं वाटत होत, याना माझ्या छोट्याशा पुस्तकाचं काय कौतुक वाटणार ? फार फार तर ' ठीक आहे ' येवढा शेरा देऊन ते माझी बोळवण करतील. येवढसं एक पुस्तक दाखवायला आणल्याबद्दल ते कदाचित् मला वेडाहि टरवतील. या शकेन मी अगदीं ओशाळा झालों आणि माझ्या मनात आलं, याची अशी भेट घेण्याचा वेडेपणा आपण करायला नको होता. अगदीं अशक्यच्च होतं म्हणून, नाहीं तर मी जागेवरून उठून नाहींसाच झालों असतों इतका माझ्या मनातला गोंधळ त्या क्षणीं वाढला होता. तितक्यात टिळकांनीं पुस्तक सोडून मान वर केली व म्हटल,

" चागलं लिहिता तुम्ही; माझा अभिप्राय छापायसाठीं हवा आहे कां तुम्हांला ? "

तें ऐकून मला विलक्षण आनंद तर झालाच, पण क्षणापूर्वीचा गोंधळ

नाहींसा होऊन, कशी कोण जाणे, एक विलक्षण धाडसी कल्पना माझ
मनांत आली आणि मी म्हटलं,

" माझं लिहिणं आपल्याला बरं वाटलं असेल तर एक विनं
करायची आहे. "

" कोणती ? "

" आपलं चरित्र लिहावं अशी माझी फार इच्छा आहे. "

कांहीं तरी विलक्षण धाडस केल्याप्रमाणें माझी छाती धडधडत होती

" कांहीं हरकत नाहीं. लिहा. " हें त्यांचं उत्तर मला ऐकूं आ
पण क्षणभर मला तें खरंच वाटेना.

जरा वेळ थाबून मीं म्हटल, " आपली सर्व प्रकारें मदत मिळेल तर
चरित्र लिहिण्याचं काम माझ्या हातून पार पडेल. "

ते म्हणाले, " करीन मी मदत. "

त्याचे आभार मानण्यासाठीं मी कांहीं तरी बोलणार होतों तोंच ते ए
म्हणाले,

" हें पहा, चरित्र लिहिण्याची तयारी म्हणून अगदीं पहिल्यां
चिरोलसाहेबानीं आपल्या ' Indian Unrest ' या पुस्तकात माझ्याविष
जे लिहिलं आहे ते सर्व काळजीपूर्वक वाचून पाहा. टिळकांच्या कट्ट
शत्रूला टिळकाबद्दल काय वाटतं ते आधीं तुम्ही समजून घेतलं पाहि
नाही का ? आमच्या लायब्ररींत तुम्हाला हें पुस्तक मिळेल. हें वाचून झ
की 'केसरी'च्या अगदी प्रारंभापासून फायली वाचून काढा. हें क
करतां मला काही विचारावंसं वाटल तर विचारीत जा. "

मला किती विलक्षण हर्ष झाला असेल त्याची कल्पनाच केलेली ब
मी चटकन् म्हटल,

" आजपासून लागतों मी कामाला. "

मग टिळकानीं आपल्या मुलाकडून ' Indian Unrest ' हें पुस्
मला देवविलं, आणि मी त्यांचा निरोप घेतला.

घरीं न जातां छापखान्यांत जाऊन आप्पासाहेब ( अनंत सखाराम
गोखले यांना मीं टिळकांनीं दिलेल्या परवानगीची हकीगत सांगित
ती ऐकून मला स्वतःला झाला नसेल इतका आनंद त्याना झाला,

' दादाभाई नौरोजी ' पुस्तकाचे जुने पुठ्ठे रद्द करून ज्यावर टिळकाच्या चरित्राची जाहिरात छापली होती असे नवे पुठ्ठे उरलेल्या सर्व प्रतींसाठीं त्यानीं छापून तयार केले !

दुसऱ्या दिवसापासून मी ' केसरी ' कचेरीच्या लायब्ररीत जाऊन ' केसरी 'च्या जुन्या फायलीचा अभ्यास करण्याचं काम सुरू केलं. रोज तीन चार तास मी तेथें बसत असे. तसा मी बसलों असताना कधीं कधीं टिळक कपाटांतलं एखाद पुस्तक काढून घेण्यासाठी त्या ठिकाणीं येत. बहुधा माझ्याकडे फक्त दृष्टि टाकून ते तेथून जात. मात्र क्वचित् एखादे वेळीं ते विचारीत,

" कितव्या वर्षापर्यंत आला आहांत ? "

मी म्हणे, " अठराशें चौऱ्याण्णव. "

" ठीक आहे. चालू द्या. "

त्याच्या त्या चारच शब्दानीं माझा उत्साह शतपट वाढे. एक अतिशय महत्त्वाचा ग्रंथ आपण लिहिणार आहोत, तो लिहिण्यांत परिश्रमांची आणि आपल्या लेखनकौशल्याची आपल्याला पराकाष्ठा केली पाहिजे इत्यादि विचार मनांत येत, व स्वतः चरित्रनायकाच्या देखरेखीखाली चरित्र लिहिण्याचं दुर्मिळ भाग्य ज्या अर्थी आपल्याला मिळाल आहे त्या अर्थी आपला ग्रथ उत्कृष्ट होणारच असहि मनात येई.

परंतु, हें चरित्र माझ्याकडून लिहिल जाव असा योगायोग नव्हता !

कारण, नतर ऑगस्ट महिन्याच्या पहिल्या तारखेस टिळकांच देहावसान झालं. माझ्या स्वतःच्या आयुष्यातहि अनपेक्षित वेगान उलटसुलट फेरे आले. आणि टिळकाच चरित्र लिहिण्याचा माझा सकल्प मागं पडला तो कायमचा !

टिळकांचा सहवास मला फारच थोडा मिळाला, परंतु तेवढ्यातहि त्यांच्या ठिकाणचा अलौकिकपणा माझ्या प्रत्ययाला अनेकदां आला. कित्येक प्रसंगीं त्यांच्या तोंडून सहज बाहेर पडलेले असे कांहीं उद्गार मला ऐकायला मिळाले कीं ते कधीं विसरतां येणार नाहींत. अशा अवि-स्मरणीय उद्गारांचं एक उदाहरण या ठिकाणीं सागावसं वाटतं.

१९२० सालच्या फेब्रुवारींत रवींद्रनाथ टागोर कांहीं थोड्या दिवसाच्या

मुक्कामासाठीं मुंबईस आले होते. आमच्या न्यू पूना ( सध्याच्या सर परशुरामभाऊ ) कॉलेजसाठीं फंड गोळा करण्याच्या कामीं जसा मीं पुढाकार घेतला होता त्याप्रमाणेंच कॉलेजचा शक्य तितक्या प्रकारें बोलबाला व्हावा व लौकिक वाढावा यासाठीं खटपटी करण्यातहि मी प्रमुखत्वानं असे. प्रिन्सिपल विनायकराव आपटे याच या कामीं मला सर्व प्रकारें प्रोत्साहन असे. फर्ग्युसन कॉलेजशीं आमची साहजिकचं स्पर्धा होती. इतर सर्व शिक्षणसंस्थाप्रमाणें आमचं न्यू पूना कॉलेज राजकारणापासून अलिप्त होतं हें खरं; परंतु, फर्ग्युसन कॉलेजचा ओढा मवाळ पक्षाकडे व आमचा जहाल पक्षाकडे हा फरक जगजाहीर होता, व त्याचं मला तरी मनांतल्या मनात फार भूषण वाटे. मोठमोठीं माणसं कॉलेजात आणून त्यांचीं व्याख्यानं करविण्याची, व फर्ग्युसन कॉलेजांत जे होत नाहीं तें आमच्या अवघ्या चार वर्षं वयाच्या नव्या कॉलेजांत आम्ही करतो असं पर्यायानं दाखवून कॉलेजचं नाव वाढविण्याची मला फार हौस वाटे.' गांधींचंसुद्धा भाषण मी कॉलेजात घडवून आणल होत हें मला पक्क आठवतं. टागोर मुंबईला आले आहेत हें कळतांच त्यांना कॉलेजतर्फे व्याख्यानाचं आमंत्रण देण्याची कल्पना माझ्या मनानं घेतली. विनायकराव मला म्हणाले,

" हें जमणार कस ? "

मी म्हटल, " जमवितों कीं नाहीं तें पाहा. " आणि मी ताबडतोब मुंबईस गेलों. मीं आपल्या मनाशीं एक बेत योजला होता.

टिळकाचा मुक्काम त्या वेळीं मुंबईसच होता, व कॉलेजतर्फे टागोरांना आमत्रण द्यायचं तें टिळकांच्याकडून देववायच असं मीं ठरविलं होतं.

टिळक मला म्हणाले, " उद्यां सकाळीं टागोरना भेटावयास मी जाणारच आहें; त्या वेळेस तुम्ही माझ्या बरोबर चला म्हणजे झालं. पण हें पाहा, फडके, एक गोष्ट सांगून ठेवतो ती लक्षात ठेवा. माझ्या आमंत्रणाच्या भिडेनं ते यायचं कबूलहि करतील, पण दोन दिवसांनीं ' व्याख्यान रहित करा ' अशी तार पाठवायला कमी करायचे नाहींत. इंग्रजींत Deeply regret हे दोन शब्द आहेत ना, त्यात इंग्रजाची सारी संस्कृति अन् नीति सांठली आहे. आणि त्या शब्दाचा भरपूर फायदा घेणारीं माणसं आपल्यातहि आहेत. इंग्रजाचं राज्य उद्यां गेलं तर Deeply regret

येवढ्या दोन शब्दांनीं वचनभंगावर पांघरूण घालण्याची सोय नाहींशी होईल याचं पुष्कळाना वाईट वाटत असेल पाहा. ”

रवींद्रनाथ टागोरांचा मुक्काम कुलाब्याच्या बाजूला त्या वेळीं राष्ट्रीय चळवळींत विशेष भाग घेणाऱ्या बोमनजीशेठ नांवाच्या एका पारशी कोट्याधीशांच्या बंगल्यावर होता. दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी टिळकाच्या-बरोबर तिकडे गेलों. टिळक, मी व अंतूकाका फडणीस येवढे आम्हीं तिघेचजण गाडींत होतों.

टिळक आल्याचं कळतांच प्रथम सी. एफ. ॲंड्र्यूज पुढें आले, व नंतर थोड्याच वेळांत रवींद्रनाथ स्वतः बाहेर आले. त्या जगद्विख्यात पुरुषाला मी प्रथमच पाहत होतों. त्याची ‘ गीताजलि ’ मीं वाचली होती. पण त्याहिपेक्षां त्यांच्या कादंबऱ्या मला जास्त आवडल्या होत्या, व कादंबरी-लेखनाचे विचार बीजरूपानं माझ्या मनांत त्या काळीं असतील अस गृहीत धरल तर त्यांच्या कादंबऱ्यांनीं त्या विचारांना मला न कळत दिशा लागत असली पाहिजे. तें कसंहि असो; त्रिखंडांत कीर्ति मिळविलेला एक हिंदी पुरुष आणि ज्याच्या लेखनशैलीविषयीं मला विलक्षण आदर व आकर्षण वाटत होतं असा एक असामान्य कादबरीकार प्रथमच जवळून पाहावयास मिळत होता. आतल्या खोलीच्या दारांतून बाहेर आलेल्या त्या आकृतीकडे मी अगदीं निरखून पाहिलं. तिच्या भव्यपणाचा माझ्या मना-वर एकदम परिणाम झाला. त्यांची ती शुभ्र दाढी, अत्यत तेज:पुंज दिसणारी मुद्रा, आणि अतिशय तलम उंची मलमलीचा त्यांच्या अंगा-वरचा पायघोळ झगा—हें दृश्य मी कधींहि विसरणार नाहीं. आणि त्यांनीं जेव्हां दिवाणखान्यात येतांच आपले दोन्ही लांबसडक बाहू पसरून टिळ-काना आलिंगन दिलं, व टिळकांनींहि आपल्या आंखूड हाताच्या मिठींत त्याना धरलं तेव्हा मला एकदम गहिंवर आला. अखिल हिंदी राष्ट्राला ज्याचा अमर्याद अभिमान वाटवा अशा दोघा नररत्नाची ती काव्यमय भेट मी प्रत्यक्ष डोळ्यानीं पाहत होतों. माझ्या आयुष्याचं सार्थक झाल्या-सारखं मला त्या क्षणीं वाटल.

टागोर टिळकांना घेऊन आंतल्या खोलींत गेले. पण टिळकांना हळू बोलणं फारसं माहीत नसल्यामुळें दोघाचा बहुतेक सवाद मला बाहेर

दिवाणखान्यांत ऐकूं येत होता. चालू राजकारणाचीच चर्चा त्या दोघात चालली होती. टिळक त्यांना आपला कार्यक्रम सागत होते, व टागोराची समजूत काहीं केल्या पटत नव्हती अस दिसलं.

सुमारें अर्ध्या तासानं टिळक बाहेर आले, व मला म्हणाले,

" फडके, तुमचं आमंत्रण यांना मीं दिलेलं आहे व यानीं यायचं कबूल केल आहे. "

त्यानीं माझं नाव रवींद्रनाथांना सांगितलं तेव्हा मी त्याना प्रणाम केला व व्याख्यानाचा विषय विचारला.

" The Song of the Forest "

असं मला उत्तर मिळाल, आणि मग व्याख्यानाचा नक्की दिवस व वेळ विचारून घेऊन मी टिळकाच्या बरोबर निघालो.

आमची मोटर चालू झाली तेव्हां एकदम माझ्याकडे पाहून परंतु आत्मगत उद्‌गार काढल्याप्रमाणें टिळक म्हणाले,

" श्रीमंत कवि आहेत झाल ! "

अर्थातच मी उलट काही उत्तर केलं नाहीं, पण मी मनांत समजलों कीं, टागोरांनीं राजकारणविषयक जे विचार अर्ध्या तासाच्या सभापणात प्रगट केले असतील त्यांना अनुलक्षून टिळकांचा तो शेरा असला पाहिजे.

पुण्यास परत आल्यावर मीं सर्वांना अभिमानानं सांगत सुटलो कीं रवींद्रनाथ टागोरांचं व्याख्यान मीं नक्की ठरवून आलो. अगदी एक मोठा पराक्रम केल्यासारख मला वाटत होत. परतु व्याख्यानाच्या आदल्या दिवशीं सी. एफ्. अँड्र्यूज यांच्या सहीची मला पुढीलप्रमाणें तार आली.

" Deeply regret, cancel Poet's Lecture. "

ती तार वाचल्याबरोबर मला टिळकाच्या भविष्याची आठवण झाली, व ' श्रीमत कवि आहेत झाल ' हे त्याचे उद्‌गार कांहीं वेळ मनांतून जाईनात.

# ७

‘ दादाभाई नौरोजी ’ नंतरचं माझं पुस्तक म्हणजे डॉक्टर गणपुले याच्यासाठीं ‘ मानसोपचार ’ नावाचं जे मोठं पुस्तक मी लिहिलं तें. या दोन पुस्तकांत विषय आणि विस्ताराच्या बाबतींत सकृद्दर्शनीं दिसणारा फरक विस्मयकारक होता. परंतु, माझ्या आयुष्यांत १९२० व २१ च्या दरम्यान जीं आंदोलनं घडलीं त्याचा तो परिणाम होता. त्याबद्दलची हकीगत पुढें क्रमानं येणारच आहे. या ठिकाणीं ‘ मानसोपचार ’ ग्रंथाचा उल्लेख येवढ्याचसाठीं केला कीं, माझ्या लेखनमार्गातील टप्पे पुस्तकांनीं मोजायचे झाले तर दादाभाईंच्या चरित्रानंतरचा टप्पा म्हणून १९२१ साली जो ग्रंथ मी लिहूं लागलों व १९२२ साली जो प्रसिद्ध झाला त्या ‘ मानसोपचार ’ नावाच्या ग्रंथाचाच उल्लेख करावा लागेल.

१९१९—२० या दोन वर्षांच्या अवधींत मीं पुस्तक असं जरी दादाभाईंचं चरित्र हें एकच लिहिलं तरी स्फुट लिखाण मीं सतत चालविलंच होतं. दुसऱ्या एखाद्या व्यक्तीचं चरित्र समजून घेण्यासाठीं त्याच्या आयुष्यांतल्या हकीगतींकडे ज्या वृत्तीनं नजर टाकावी त्या वृत्तीनं मी माझ्या

साहित्यसेवेंतल्या गतगोष्टीकडे आता पाहात असल्यामुळें त्या दोन वर्षांत माझ्याकडून झालेल्या स्फुट लेखनाच्या विपुलतेपेक्षा त्याची विविधता मला अधिक लक्षांत घ्यावीशी वाटते. रंगभूमि, नाट्य, संगीत, ज्ञानेश्वर, तुकाराम व रामदास यांचं वाङ्मय आणि तत्त्वज्ञान, आणि त्या काळातील राजकारण अशा भिन्नभिन्न विषयांवर मी लेख लिहीत होतों. 'भावबंधन' नाटकावरील माझी टीका प्रसिद्ध होतांच खुद्द श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांच्याकडून त्यांची माझी पूर्वीची ओळख नसताना प्रशंसेचं पत्र जसं मला आलं, तसंच माझ्या संगीतविषयक लेखामुळें बनारसहून अखिल भारतीय संगीत परिषदेसाठीं मला आमंत्रण आलं. 'श्रीसमर्थ-संदेश' हा माझा लेख 'मनोरंजनां'त प्रसिद्ध झाला तेव्हां समर्थवाङ्मयाच्या एका प्रसिद्ध संशोधकाकडून मला शाबासकी मिळाली, आणि राजकीय विषयांवरचे माझे लेख तर लोकप्रिय होत होतेच.

अशा विविध लिखाणाच्या मागची माझी मनोभूमिका मी जेव्हा आज आठवून पाहतो तेव्हां मला असं स्पष्ट दिसतं कीं, त्या दोन वर्षांत तीन वेगवेगळ्या वृत्ती माझ्या ठिकाणीं वेगानं वाढत होत्या. त्यापैकीं कोणत्या दोन मागं पडतील व कोणती एक माझ्या आयुष्याचा अल्पकालापुरता का होईना पण ताबा घेईल तें माझं मला ठरविता येण्यासारखं नव्हतं. भोवतालच्या परिस्थितींतील कोणत्या घटनेचा माझ्यावर किती प्रमाणांत परिणाम होईल यावर ती गोष्ट अवलंबून होती.

त्या काळांत मी तीन व्यक्ती मिळून बनलेला होतों, व माझ्या लिखाणांतून त्या तीन भिन्न भिन्न व्यक्ती प्रगट होत होत्या असं म्हणतां येईल. त्यापैकीं एक व्यक्ती संगीताच्या मागं लागली होती, दुसरी गंभीर वृत्तीनं भक्तिमार्गाकडे झुकूं लागली होती, आणि तिसरी राजकारणाकडे वळून देशसेवेचीं स्वप्नं रचीत होती. या तिन्ही वृत्ती भिन्नभिन्न असूनहि माझ्या लेखनांत उत्कटतेनं प्रगट होण्याइतक्या बळावल्या होत्या. माझ्या मनाचा व आयुष्याचा पूर्ण ताबा घेण्यासाठीं त्यांची धडपड चालली होती. त्यांच्या या झटापटीचा निकाल नाट्यपूर्ण अनपेक्षितपणानं १९२० च्या नोव्हेंबर महिन्याच्या अखेरीस व्हायचा होता.

बी. ए. झाल्यानंतर लगेच अब्दुल करीमखांसाहेबांच्या विद्यालयांत मी

पेटी शिकूं लागलों तेव्हांपासून संगीताचा छंद मला लागला तो सारखा वाढतच गेला. शेंपन्नास लोकांच्या बैठकींत एकदोन चिजा व्यवस्थितपणें वाजवून दाखविण्याइतकी .हार्मोनियममध्यें माझी गति लवकरच झाली. सुदैवानं पेटी वाजविण्यात नावाजलेल्या निवडक कलावंतांकडून मला शिक्षण मिळालं; अन् त्याचा मीं भरपूर उपयोग करून घेतला. या शिक्षणात माझी जों जों प्रगति झाली तों तों संगीताविषयीं माझं आकर्षण विलक्षण वाढूं लागलं, व गायन, वादन आणि नृत्य या तिन्ही कलांचा चांगला समज आपल्या ठिकाणीं असावा, समजदार रसिक श्रोत्याची पात्रता आपल्या अंगीं असावी ही इच्छा बळावत गेली. नामांकित कलावंताचीं गाणीं—बजावणीं ऐकण्याचा मीं अगदीं सपाटा चालू केला. त्या दिवसांत रात्रीचे एक-दोन वाजल्याखेरीज मी क्वचितच निजलों असेन. कै. भास्करबुवा बखले त्या सुमारास ऐन जोसांत होते. कृष्णा मास्तर मागें तंबोरा घेऊन बसले आहेत, गुंडोपंत वालावलकर डाव्या हाताला पेटीवर आहेत, आणि कुणी तरी.नामांकित बजवय्या उजव्या हाताला तबल्यावर आहेत, अशा थाटात कमालीचीं रंगलेली भास्करबुवांचीं गाणीं मीं किती ऐकलीं असतील त्याला गणति नाहीं. अल्लादियाखा, अब्दुल करीमखां, वझेबुवा अशा थोर थोर कलावंताचं गाणं ऐकण्याची एकहि संधि मीं वायां जाऊं दिली नाही. रहिमतखांचं गाणं ऐकण्यासाठीं मी मुद्दाम कुरुंदवाडला सुद्धां गेलों. बालगंधर्वांच्या गायनावर त्या वेळीं सारी दुनियाच लुब्ध होती त्याप्रमाणें मीहि होतों, अन् त्याचीं नाटकं पाहण्याचा मला विलक्षण षोक लागला होता. त्यांच्या नव्या नाटकाच्या पहिल्या प्रयोगाला अथवा गांवांत होणाऱ्या कोणत्याहि मैफलीला मी गैरहजर असेन हें त्या वेळीं शक्यच नव्हतं.

मात्र, माझा षोक आंधळा असूं नये असं मला वाटे, आणि त्यामुळें भारतीय संगीताचा शास्त्रदृष्ट्या अभ्यासहि मीं चालू ठेवला. चांगलं स्वर-ज्ञान व्हावं म्हणून नुसत्या पेटी वाजविण्यावर सतुष्ट न राहतां तंबोऱ्यावर गाण्याचं शिक्षण घेण्यास मी सुरवात केली, आणि तालाची माहिती असावी या हेतूनं मी तबलाहि शिकूं लागलों. या खटपटीमुळें माझा सगीतातला समजदारपणा तर वाढत गेलाच, पण शिवाय शास्त्राचा अभ्यास करण्या-साठीं वळलेल्या माझ्या दृष्टीला नवीन खाद्य मिळूं लागलं. त्या वेळीं ‘फिल

हार्मानिक' सोसायटीनं बनविलेली बावीस श्रुतींची पेटी म्हणजे एक चर्चेचा विषय होऊन राहिली होती. तो वाद मी समजून घेऊं लागलो. तेव्हा त्याच्या अनुषंगानं आपल्या संगीतशास्त्रांतल्या अनेक गोष्टींचा अभ्यास मला करावा लागला. कोणत्याहि शास्त्रांतली एखादी नवी गोष्ट स्वतःला समजली व पटली आणि ती सर्व लोकाना समजून दिली पाहिजे असं मनाला वाटलं कीं, त्या विषयावर लेख लिहावयाचा, हा माझा क्रम त्या वेळींहि होता. बावीस श्रुतींचा वाद, हिंदी संगीताच्या नोटेशनची शक्यता व इष्टता, इत्यादि विषयावर मीं बरेच लेख लिहिले. मुंबईस गांधर्व महाविद्यालया-तर्फे भास्करबुवांच्या अध्यक्षतेखाली जी संगीत परिषद झाली तिच्यांत 'अणुरणन' या विषयावर मीं जो निबंध वाचला त्यामुळें तर खुद्द कै. पंडित पलुस्कर यांच्याशीं माझी झटापट उडाली. पंडितजी म्हणजे वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध असे केवढे अधिकारी पुरुष! ज्यानं अजून वयाची पंचविशी ओलांडली नव्हती, व 'अपार नादसमुद्रा' च्या लाटाचा किनाऱ्यावरचा फेससुद्धा ज्याच्या हातीं अजून पुरता लागला नव्हता अशा माझ्यासारख्या तरुणाची त्याच्यापुढें कसली योग्यता! परंतु, वादात सत्य माझ्या बाजूचं होतं हें मला माहीत होतं, आणि म्हणून सारं वक्तृत्वकौशल्य खर्चून मी पंडितजींशीं भर सभेत वाद केला, आणि माझं म्हणण सिद्ध केलं. माझी कल्पना होती कीं पंडितजी माझ्यावर रागावतील. परंतु तसं झालं नाहीं. उलट त्या वादामुळें त्याची माझ्यावर मर्जी बसली व त्यांच्या आयुष्याच्या अखेरीपर्यंत ती कायम होती.

बावीस श्रुतींचा सिद्धांत लेखांच्या व भाषणाच्या द्वारें मी पुष्कळ यशस्वी रीतीनं पुढें मांडतों असं दिसून आल्यावरून १९१९ सालच्या हिवाळ्यात बनारसला जी अखिल भारतीय संगीत परिषद झाली तिला 'फिल हार्मानिक' सोसायटीनं आपला प्रतिनिधि म्हणून मला पाठविलं. या परिषदेस हजर राहण्याची संधि म्हणजे माझ्या संगीतविषयक लेखांच्या कामगिरीच्या मानानं फार मोठा मोबदला मला मिळाला. कारण रामपूर, उदेपूर, जयपूर, लाहोर, अमृतसर, कलकत्ता, बडोदा, इंदूर अशा उत्तर-हिंदुस्थानांतील सर्व प्रमुख केंद्रांहून बडेबडे गवय्ये आणि बजवय्ये परि-षदेला आले होते, व उत्तमातल्या उत्तम संगीताची अगदीं आकंठ मेजवानी

मला झोडायला मिळाली. एकाहून एक वरचढ असे गायक, बिनकार, सारंगीये, सरोदिये, पखवाजी ऐकता ऐकता मी खरोखरच तहानभूक विसरून गेलों होतों. 'सरोद' हें वाद्य मीं त्या परिषदेंत प्रथम ऐकलं. आणि तें मला फारच आवडल. बनारस शहरातल्या ऐन विलासी मोहल्यात भटकून बनारसी कवालीच्या व ठुमरीच्या खास तऱ्हा मला ऐकायला सापडल्या. गवयाचं गाणंसुद्धां निष्प्रभ करून टाकण्याच्या तयारीनं सनई वाजविणारे कलावंत मी ऐकले. आणि परिषद आटोपल्यावर दुसऱ्या दिवशीं रात्रीं काशीच्या राजेसाहेबांच्या प्रासादांत शेलक्या पाहुणे मडळींसाटीं अल्लाबंदेखां व जाकुद्दिनखा या दोघां बधूंची जी मैफल झाली तिची माझ्या मनांतील स्मृति तर कधींच पुसली जाणं शक्य नाही. इकडे ज्याप्रमाणें अल्लादियाखा याचं स्थान सर्व कलावंताच्या अग्रभागीं आहे त्याप्रमाणेंच त्या वेळीं या उभयतां बंधूंच गायन म्हणजे विद्वत्तेची व नैपुण्याची परमावधि समजली जात असे, आणि ही समजूत अगदीं योग्य असल्याचा मला त्या रात्री पूर्ण प्रत्यय आला. ऐन मुसलमानी थाटाच्या उची पोपाखांत शेजारी शेजारी आसन ठोकून बसलेले ते दोघे वृद्ध कलावंत, साथीसाटीं बाजूस बसलेला मृदगकार, दोघा बधूंच्या कंठातून आळीपाळीनं धमाराच्या तालाशीं मोहक कसरत करीत निघणारे त्या त्या रागिणींचे लयबद्ध पिळदार आलाप, आणि गंभीरप्रकृति मधुरस्वरलहरीच्या त्या अव्याहत क्रीडेनं वेडावलेल्या तज्ञ वा अज्ञ श्रोत्याच्या मुखांतून सारख्याच तत्परतेनं निघणारे 'वाहवा!' 'बहोत खाशी!' इत्यादि उद्गार-या सगळ्या स्मृती अजूनहि माझ्या चित्तांत ताज्या आहेत. धृपदधमाराचं आलापी गायन किती कमालीचं श्रुतिमनोहर असत त्याचा बनारसला मला प्रथम अनुभव आला. आपल्या सगीताबद्दलचं माझं वेड त्यामुळें दसपटीनं वाढलं.

माझ्या नाटकाच्या आणि संगीताच्या या षोकाचा माझ्या वागण्यावर आणि आवडीनिवडीवर परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं. वाईट अर्थान मी 'बिघडलो' अस मुळींच नव्हे. परतु, कपड्यालत्त्यांचा छाकटेपणा माझ्या अंगी आला खरा. माझ्या षोकामुळें ज्यांचा सहवास मला कमी अधिक घडला त्यांच्या संवयी आणि रीतिरिवाज मी उचलले. केसाचीं झुलपं वाढवावी, निरनिराळ्या रंगांच्या उची फरच्या टोप्या घालाव्यात,

अगदीं तलम विलायती मलमलीचं धोतर वापरावं, अन् तें सुद्धां नाटकी पद्धतीनं नेसावं, अंगावर शेरवानीसारखा लांब कोट चढवावा, पायांत पपशू घालावेत—असे षोक मी करूं लागलों. त्या वेळीं कॉलेजांत जातांना मी सूटबूट घालीत असे, आणि लहानमोठ्या व्याख्यानाच्या वेळेस जरीकांठी शुभ्र रुमाल आणि उपरण असा पोषाख करीत असे. परतु, या व्यतिरिक्त इतर ठिकाणीं व प्रसंगीं ज्यांनीं मला पाहिल असेल त्यांना हा कोणी तरी नाटकी छाकटा आहे असच वाटल असेल. लोकाना तस वाटण्यासारखं आपण वागतो यात मला आनंद होई, इतका मी नाटकाच्या व सगीताच्या षोकात वाहत चालला होतो.

आणि चमत्कार असा कीं याच वेळीं दुसरी एक अगदी भिन्न वृत्ति माझ्या ठिकाणीं बळावत होती.

ही वृत्ति मराठी सतवाङ्मयाच्या वाचनानं उत्पन्न झालेली होती, माझे वडील पट्टीचे वेदाती, योगाभ्यासी आणि स्नानसध्या उपासना इत्यादीत सतत रमणारे असे अत्यंत चिकित्सक अभ्यासू होते. फडणिशीच्या व मामलेदारीच्या हुद्द्यावर ते असताना त्यानीं परिश्रमपूर्वक बसवून हौसेनं केलेली कीर्तनं मी माझ्या लहानपणीं ऐकली होतीं. या गोष्टीचे सस्कार माझ्यावर झाले असलेच पाहिजेत. साहित्यक्षेत्रात थोडं नांव मिळवून जेव्हां मी विस्तृत वाचन करूं लागलों तेव्हा 'ज्ञानेश्वरी' मी हातीं घेतली, आणि त्या पुस्तकान मला अगदी भारून टाकल. या ग्रथाचं मर्म कळावं म्हणून नामांकित सांप्रदायिकाचीं प्रवचन मी ऐकूं लागलो. जोगमहाराजाचीं भजनी कीर्तनं त्या वेळीं फार प्रसिद्ध होतीं. त्यांची गोडी मला अवीट वाटली. श्री. देशमुख नांवाचे एक पदवीधर ज्ञानेश्वरीवरील त्याच्या मार्मिक प्रवचनांबद्दल फार प्रसिद्ध होते. तीं ऐकायलाहि मी अगदीं नियमानं जाऊं लागलो. उपासतापास मी कधी केले नाहींत, परंतु मनानं मी अगदीं पूर्णपणें भक्तिमार्गावर प्रेम करूं लागलों. परमेश्वराच्या अस्तित्वाबद्दल खात्री बाळगून आपली सर्व कृत्य कृष्णार्पण करण्याच्या बुद्धीन आयुष्य कंठण्यांतच मानवी जन्माचं सार्थक आहे असं मला अगदीं प्रामाणिकपणानं त्या वेळीं वाटत असे. नामस्मरणाची महतीसुद्धां मला पटूं लागली. इतकी कीं, भास्करबुवाचं गायन तर मला अतिशय प्यार वाटेच, परंतु ते गप्पा मारीत

किंवा विश्राति घेत बसले म्हणजे मधूनच स्वतःशी 'सद्गुरु! सद्गुरु!' असा उद्गार काढीत तो माझ्या हृदयाला जाऊन भिडे. माझी ही भक्तिमार्गावरची आसक्ति कोणत्या थराला गेली असती कोण जाणे!

परंतु, ही वृत्ति आणि प्रथम सांगितलेली संगीतलोलुप वृत्ति यांच्याबरोबरच तिसरी एक उत्कट वृत्ति त्या काळीं माझ्या ठिकाणीं वाढत होती, आणि १९२० च्या नोव्हेंबर महिन्यात तिचा एकदम इतका अचानक स्फोट झाला कीं, तिच्या आवेगापुढें बाकी साऱ्या प्रवृत्ती अल्पकालापुरत्या कां होईना पार दडपल्या गेल्या.ही वृत्ति लोकमान्य टिळकांच्या राजकारणाबद्दल मला पहिल्यापासून जो विलक्षण आदर होता त्यातून निर्माण झालेली होती.

१९०८ साली टिळकांना शिक्षा झाली त्यावेळीं मी अवघा चवदा वर्षांचा इंग्रजी सहाव्या इयत्तेला विद्यार्थी होतों. परंतु, टिळक मंडालेकडून अचानकपणें सुटून १९१४ सालच्या जून महिन्यातील १७ तारखेस गायकवाडवाड्यातील आपल्या निवासस्थानीं परत आले तेव्हा चालू राजकारणाकडे दृष्टि ठेवण्याइतका मी जाणता झालों होतो. सहा वर्षांच्या बंदिवासानंतर परत येताच एक दिवसाचाहि विलंब न करता राजकारणाची झटापट त्यांनीं पूर्ववत चालू केलेली पाहून माझं मन त्यांच्याकडे विशेष आकृष्ट झालं, आणि तेव्हापासून त्यांची प्रत्येक कृति व चळवळ मी विशेष लक्षपूर्वक पाहत गेलों. कॉंग्रेस पूर्णपणें राष्ट्रीय वृत्तीची व्हावी एतदर्थ त्यांनीं केलेले प्रयत्न, हिंदुमुससमानांचं ऐक्य घडवून आणण्यासाठीं त्यांनीं दाखविलेला मुत्सद्दीपणा, महायुद्धाच्या समाप्तीनंतर ब्रिटिश लोकांची राजनीति हाणून पाडण्यासाठीं त्यांनीं स्वीकारलेली भूमिका, लोकजागृति करण्यासाठीं त्यांनीं केलेला राघोभरारी दौरा, त्यांची विलायतेची सफर इत्यादि गोष्टींमुळें त्यांचा लोकोत्तरपणा मला अधिकाधिक पटू लागला होता. १९२० सालीं तर त्यांच्या थोड्याशा सहवासांतच मी आलों, आणि त्यांच्या राजकारणांत शक्य तेवढा भाग घेण्याची इच्छा माझ्या ठिकाणीं उत्पन्न झाली. ऑगस्टच्या पहिल्या तारखेस त्यांचं देहावसन झालं तेव्हां मला मनस्वी दुःख तर झालंच. परंतु त्यांचं ऋण फेडण्याच्या दृष्टीनें राजकारणाचं कार्य आपल्याला कितपत करतां येईल याचा विचारहि मी करूं लागलों. त्यांच्या दहाव्या दिवशीं पुण्यांत रे मार्केटच्या मागल्या पटांगणांत लाला लजपतरायांच्या अध्यक्षतेखालीं जी

अतिप्रचंड शोकसभा झाली तिच्यात मीं जे भाषण केलं तें अत्यत भावना-प्रधान होत. लाला लजपतराय यानीं त्याबद्दल शाबासकी देऊन म्हटल. "तुमच्यासारखीं माणसं चळवळींत पडली पाहिजेत." त्याच्या या चारच शब्दाचा माझ्या मनावर फार परिणाम झाला असला पाहिजे.

आणि नतर लौकरच देशातली राजकीय चळवळ अशा काही झंझा-वाताच्या वेगानं फिरत गेली, आणि महात्मा गाधींनी केलेल्या असहकारि-तेच्या घोषणेचा माझ्या मनावर इतका तीव्र परिणाम झाला कीं, राजकारणात उडी घेतल्यावाचून मला राहावेना. कॉलेज सोडाव कीं सोडू नये याबद्दलच्या विचारात मी फारसे दिवस घालविले नाहीत. दिवाळीच्या सुटीनतर कॉलेज पुन्हा सुरू होऊन दोन चार दिवस झाले नाहीत तो एके दिवशी माझा लॉजिकचा तास घ्यावयासाठीं म्हणून जो वर्गात गेलो तो "मित्रहो, मी असहकारितेच्या चळवळींत सामील व्हायचं ठरविलं आहे. तेव्हा, नमस्ते!" अस म्हणून परत आलो.

माझ्या या कृत्यानं केवढीं खळबळ उडाली व केवळ पुणें शहरांतल्याच नव्हे तर अखिल महाराष्ट्रातल्या विद्यार्थिवर्गात मी केवढा प्रचड उत्साह निर्माण करू शकलों त्या गोष्टीचं वर्णन या ठिकाणीं अप्रस्तुत ठरेल. माझ्या साहित्यसेवेला या घटनेनं जी दिशा मिळाली तिचाच उल्लेख येथें करतो. ती दिशा अशी कीं, 'केसरी' व 'मराठा' या पत्राच्या संपादक मंडळात मी काम करू लागलों, प्रोफेसरची नोकरी करतां करता हौसेनं लिहिणारा लेखक ही माझी भूमिका संपून संपादकाच्या पेशानं लिहिणारा लेखक अशी माझी नवी भूमिका यापुढें सुरू झाली.

# ८

१९२० च्या नोव्हेंबर महिन्यांत न्यू पूना कॉलेज सोडून ‘ केसरी ’ संथेंस्त दाखल झाल्यावर एकीकडे टिळक राष्ट्रीय विद्यापीठांत अध्यापकाचं काम विनावेतन करून मी ‘ केसरी ’ सस्थेंतली जबाबदारी सभाळू लागलों. टिळक जीवंत असताना प्रत्यक्ष त्यांच्या नजरेखाली काम करण्याची सधि मला मिळाली असती तर मला अमरिमित धन्यता वाटली असती. परंतु, त्याच्या पश्चात् का होईना ‘केसरी’ कचेरींत मी दाखल झालो व सपादक कचेरींत एक स्वतत्र टेबल मला मिळाल, या गोष्टीचा आनदहि काही कमी नव्हता. त्या टेबलाशीं बसून ज्या दिवशीं मी प्रथम मजकूर लिहिला त्या दिवशीचा माझा अभिमान काहीं विचारूं नका !

‘ केसरी ’ कचेरींत असताना ‘ केसरीं ’ त मी थोडं लिहीत असे. त्याचं इंग्रजी भावंड जे ‘ मराठा ’ पत्र त्याचंच अधिक काम माझ्याकडे सोंपविण्यांत आलं होतं. श्रीयुत तात्यासाहेब केळकर यांच्या सूचनेवरून ‘विविध विचारतरंग’ नांवाचं सदर ‘ केसरी ’ च्या प्रत्येक अंकात मी लिहू लागलों. चुरचुरीत विनोदी स्वरूपाच्या टीकेचं तें सदर होतं. वाचकांना तें

फार आवडत असे, व पुढें मी 'केसरी' सोडून गेल्यावरहि कांही दिवस तें चालू ठेवण्यांत आलं होतं. या सदरापलीकडे 'केसरीं'त फारस लिहिण्याची संधि मला मिळाली नाहीं. 'मराठा' पत्रांत मात्र मी खूपच लिहीत असे. त्या पत्राचे संपादक श्री- बाबूराव गोखले प्रचारकार्यात इतके गुंतलेले असत कीं बहुतेक प्रत्येक अंकाचं लेखन संपादन मलाच करावं लागे. पुष्कळदा असं होई कीं, रविवारी प्रसिद्ध होणारा 'मराठ्या'चा अंक छपाईच्या यंत्रा-वर चढलेला असताना बाबूराव कुठल्या तरी परगावचं व्याख्यान आटपून येत, 'काय फडके, ठीक आहे ना? अंक तयार?' असं विचारीत, अन् मी 'आलबेल' दिली कीं घरीं निघून जात. पण 'मराठ्या'चं सर्व लेखन मला संभाळावं लागत याबद्दची तक्रार मनांत घेण्याऐवजीं तें मला करायला मिळतं ही मोठी संधि आहे असं मला वाटे,व त्या संधीचा अगदीं भरपूर फायदा करून घेण्याचं मी मनानं ठरविलं होतं. 'मराठा' पत्राच्या वर्गणीदाराची संख्या जरी थोडी होती तरी त्याचा प्रसार हिंदुस्थानातच नव्हे तर इंग्लंड, अमेरिका इत्यादि परदेशातील वृत्तपत्रीय केंद्रांतही होता. 'केसरी' कचेरींत काम करूं लागल्यानंतर थोड्याच दिवसात मला कळून चुकलं, कीं एखाद्या घरात धर्मार्थ वाळगलेल्या बिनवारशी पोराची जशी अवस्था असावी तशीच 'केसरी' कचेरींत 'मराठा' पत्राची होती. 'केसरी'-च्या बरोबरच टिळकानीं 'मराठा' पत्राला जन्म दिला, व तें बंद करण्याची सोयच नव्हती, एवढ्याचसाठीं तं चालविण्यात येत होतं. त्याकडे विशेष आस्थेनं लक्ष द्यावं असं जबाबदार व्यक्तींपैकीं कुणालाहि वाटत नव्हतं. तथापि, मला हेंहि दिसू लागलं कीं हिंदुस्थानातील इतर प्रांतात आणि परदेशात लोकमान्य टिळकांचं मुखपत्र म्हणून 'मराठा' पत्राकडे लोकांचं लक्ष होतं. तेव्हां आपण जें लिहू तें वाचणाऱ्यांची संख्या मोठी नसली तरी त्याचे वाचक फार दूरवर पसरलेले आहेत हें ध्यानांत वागवून मी 'मराठा' पत्रातील माझं लिखाण शक्य तितक्या उच्च दर्जाचं व्हावं अशी काळजी घेऊं लागलो. माझं इंग्रजी चांगलं होतं खरं, परंतु 'मराठा' पत्रांतलीं मतं म्हणजे टिळकपक्षाचीं मतं समजलीं जातात, आणि त्यातले लेख महाराष्ट्रीय लोक इंग्रजी कसं लिहितात त्याचा नमुना गणला जातो, या जाणीवेमुळें माझ्यावर फार मोठी जबाबदारी आहे असं मला वाटे; आणि 'मराठा'

पत्रांतील अग्रलेखात व स्फुटात माहितीची सखोलता, देशभक्तीचा आवेश, याबरोबरच इंग्रजी भाषेची सफाई, तिच्यातील स्वभावसुलभ उपहासात्मक विनोद इत्यादि गुणहि दिसून आले पाहिजेत अशी मनाशीं महत्त्वाकांक्षा ठेवून मी प्रत्येक लेख लिहिताना फार परिश्रम घेऊ लागलो. ही जी जबाबदारीची जाणीव व शिस्त मी स्वतःला लावून घेतली तिचा मला फार फायदा झाला असला पाहिजे.

मात्र, स्वतःच्या बुद्धीनं माझं मीच घेतलेल्या या शिक्षणापलीकडे ‘ केसरी ’ कचेरीत मला शिक्षण, मार्गदर्शन, अगर प्रोत्साहन मिळालं नाहीं. श्रीयुत बाबूराव गोखले माझ्याशी अगदी खेळीमेळीनं वागत व कचेरींत त्याची माझी क्वचित गाठ पडली तर प्रचलित विषयावर पुष्कळ चर्चा करीत. परंतु ते माझ्या आधीं कित्येक वर्षे ‘केसरी’ त दाखल झाले होते व ज्येष्ठ व्यक्तींच्या पुढ्यातले होते यापलीकडे मी मनानं त्याची श्रेष्ठता मानीत नव्हतो. मला त्याच्यापासून काही शिकायचंच नव्हत. एखादा लेख लिहिताना मला काही विशेष माहिती किंवा आकडेवारी हवीशी वाटली तर श्री. तात्यासाहेब करदीकर यांना मी विचारीत असे, व प्रत्येक वेळीं ते मोठ्या तत्परतेनं मला सहाय्य करीत असत. परंतु, ते स्वभावानं अबोल आणि गभीर असल्यामुळें त्याच्याकडे शक्य तो कमी जावसं वाटे. आणि श्री. तात्यासाहेब केळकर याच्याशीं चार शब्द बोलण्याची वेळ तर क्वचितच येई. ‘केसरी’, ‘मराठा’ म्हणजे जहाल राजकारण खेळविणाऱ्या एका बलवान् पक्षान चालविलेली केवढीं महत्त्वाची पत्र! त्यातील मजकुराच्या जुळणीसबधी मी दुरून कल्पना केली होती ती अशी, कीं मुख्य सपादक आठवड्यातून एकदा तरी सर्व उपसपादकांची बैठक भरवीत असतील, राजकारणातल्या ताज्या घडामोडीच स्वरूप त्यांना समजावून देत असतील, व येत्या अंकातील लेखात कोणत्या धोरणान काय मजकूर यावा व त्यापैकी कोणी कोणता लिहावा त्याचे बेत ठरवून देत असतील. परंतु ‘केसरी’ कचेरीत अशी काहीं शिस्त असल्याचं मला कधींच दिसून आलं नाहीं. मुख्य संपादक व त्याच्या हाताखालचे उपसंपादक याचं नातं क्रिकेटच्या खेळात कप्तान व बाकीचे गडी यामधील नात्यासारखं असेल अशी माझी अपेक्षा होती, ती अगदींच खोटी ठरली. या विचित्र पद्धतीचा ( म्हणजे

पद्धतीच्या अभावाचा ) मी स्वतःच्या मनाशीं असा खुलासा करून घेऊं लागलो कीं, सपादक मंडळातल्या ज्या त्या व्यक्तीला शक्य तितकं स्वातंत्र्य मिळावं, कुणाच्याही कामात दुसऱ्याची फारशी ढवळाढवळ होऊं नये. परतु खुलासा म्हणून ही कल्पना ठीक असली तरी अखिल भारतीय महत्त्वाच्या वृत्तपत्रांच्या कचेरींतल्या सुसूत्रतेचं जे चित्र मला प्रिय झाल असतं,त्याच्याशीं ती जुळत नव्हती. यामुळें माझ्या उत्साहाचा, व मला काहीं तरी शिकतां येईल या आशेचा विरस झाल्यासारखं मला हलके हलके वाटू लागलं. मला वाईट रीतीनं वागविण्यांत आल अस मला यत्किंचितहि ध्वनित करायचं नाहीं. केळकरापासून तो व्यवस्थापक श्रीयुत बाबा विद्वास याच्या-पर्यंत सर्वजण माझ्याशीं अत्यत सौजन्यानं वागत असत. परंतु मला या ठिकाणीं केवळ सौजन्य नको होतं. माझी भूक निराळी होती. माझ्या लिहिण्याकडे लक्ष ठेवण्यात येईल, माझ्या चुका दाखविल्या जातील, गुण दिसतांच कौतुक करण्यात येईल अशी अपेक्षा मनाशीं धरून मी ह्या संस्थेंत शिरलो होतो. या अपेक्षेचा भंग झाल्याचा दोष माझ्याकडेच येत होता, हेंहि काहीं दिवसानीं मी आपल्या मनाशीं कबूल करूं लागलों. परंतु, अशी कबुली दिली तरी मनाचा विरस झाला होता तो थोडाच नाहींसा होणार होता ?

या विरसाचा परिणाम मला मनांतल्या मनात ठेवता आला असता; परंतु याखेरीज निराळ्या एका प्रकारें माझा विरस व्हावा अशाहि गोष्टी हलके हलके घडू लागल्या. मी असहकारितेच्या चळवळींत पडलो होतों तो तिच्या यशाविषयीं किंचितहि सशय मनात न ठेवतां व तिच्यांतील बहिष्काराच्या कार्यक्रमाबद्दल कोणताहि संकोच न बाळगता. ‘ केसरी ’ पक्षाचं धोरण तितकंच असंदिग्ध व निःसंकोच असेल अस मला वाटत होतं. परंतु हा माझा हिशेब चुकला होता. अस वाटण्यासारख्या गोष्टी हळूहळू माझ्या लक्षात येऊ लागल्या होत्या. केळकर जरी गांधींना सामील झाले होते तरी चळवळीशी तद्रूप झाले नव्हते. याबद्दल मी त्याना यत्किंचित् दोष देऊं इच्छीत नाहीं. कोणत्याहि गोष्टीत व्यवहार्यतेवर नजर ठेवणारी त्यांची चिकित्सक दृष्टि तद्रूपतेच्या आड येण्यासारखीच होती. गांधींच्या असामान्य व्यक्तित्वामुळेंच केवळ बाह्यात्कारी त्याच्या चळवळींत पडलेले केळकराच्यासारखेच इतरहि अनेक दुय्यम पुढारी देशांत ठिक-

ठिकाणीं होते, हेंहि थोड्या कालातरानं दिसून आलं. तेव्हा केळकर चळवळीशीं तन्मय झाले नव्हते ही गोष्ट त्याच उण काढण्याच्या बुद्धीनं मी लिहीत नाहीं. परंतु त्याच्या व माझ्या वृत्तींतल्या फरकाचे विचित्र परिणाम होऊं लागले व त्यामुळें माझा विरस झाला हें मला सांगितलच पाहिजे.

या विपरीत परिणामाची थोडीशी कल्पना देण्यासाठीं एकच गोष्ट सांगितली असतां पुरेशी होईल. माझ्या अंगच्या वक्तृत्वामुळें त्या वेळीं माझ्याकडे प्रचारक पुढाऱ्याची छोटीशी भूमिका आली होती. अनेक सभातून मला बोलावं लागे. परंतु अशा सभांतल माझ बोलणं आणि केळकराचं 'केसरीं' तल लिहिण या दोहोत मेळ राहीना. पुष्कळदा अस होई कीं, सोमवारीं सध्याकाळीं एखाद्या सभेत मी असहकारितेच्या चळवळीचा आत्यंतिक पुरस्कार करी, आणि दुसऱ्या दिवशीं सकाळच्या 'केसरीं'त असहकारितेच्या सीमाच आणि वैगुण्याच विवेचन केळकरानी केलेलं माझ्या पाहण्यातं येई. ही विसगति माझ्या मनाला टोचत राही. ती मला टाळतां येईल असंहि चिन्ह मला दिसेना. माझ्या मनातला विरस सूक्ष्मपणें वाढूं लागला.

तरीदेखील 'केसरी' कचेरींतील काम चालूं ठेवण्यांत चिकाटी धरा वी अस मला वाटलं असतं, परतु याच सुमारास गाधींनीं स्वतःच माघार घेतल्यासारखं चळवळीच एक पाऊल माग ओढल आणि त्यामुळें मात्र आपण यापुढें राजकीय क्षेत्रांत राहावं किंवा नाहीं असा विचार मी जोरान करूं लागलों.

गांधीनीं सरकारी शिक्षणसंस्थांवरचा बहिष्कार सोडून दिला. त्या संस्थात ज्याना जायच असेल त्यानीं जाव अशी परवानगी त्यानीं जाहीर केली!

'केसरी' कचेरींत मी नोकरी करीत होतो हें जरी खरं तरी टिळक राष्ट्रीय विद्यापीठांत अध्यापनाचं जें काम मी विनावेतन करीत होतो तेहि मला प्रिय होत; नव्हे, तेंच मला अधिक प्रिय होत. गांधींनीं शिक्षणविषयक बहिष्कार रद्द केल्यामुळें नुकत्याच अंकुर धरू लागलेल्या टिळक विद्यापीठासारख्या राष्ट्रीय शिक्षणसस्थांची अल्पकालांत किती शोचनीय दुर्दशा उडेल याची सहज कल्पना करतां येण्यासारखी होती. ज्यांत पुरते

पांचपन्नास सुद्धां विद्यार्थी नाहींत अशा विद्यापीठांत यापुढें मला काम करावं लागेल हें मला उघडउघड दिसूं लागलं. या स्थितीलाहि मनाची तयारी ठेवण्याचा जो खंबीरपणा माझ्यासारख्या इतर काहीं त्यागी व्यक्तींनीं दाखविला तो मी दाखविला नाही याचं कारण असं कीं, गाधींच्या लहरी-पणाची व त्याच्या या स्वभावामुळें त्याच्या अनुयायाना एकदां या दिशेनं तर एकदा त्या दिशेनं जावं लागावं या अनिश्चित अवस्थेची मला मनस्वी चीड आली !

मी राजकीय चळवळींतून अंग काढून घ्यायचं ठरविलं !

आणि आपल्याला यापुढें राजकारणांत राहायचं नाहीं तर 'केसरीं'त तरी आपण कोणत्या नात्यान राहूं शकतों असं वाटून 'केसरी' कचेरीहि सोडण्याचा मीं निश्चय केला !

मी न्यू पूना कॉलेज सोडलं तेव्हां त्या गोष्टीमुळें जशी खळबळ उडाली तशीच मी चळवळींतून अंग काढून घेतल्याच कळतांच उडाल्यावाचून राहिली नाहीं. सगळयात उच्च स्थानावर जे पुढारी असतात त्यानीं माघार घेतली अगर शब्द फिरविला तर त्यांच्या त्या पगडी फिरविण्यांतहि काहीं खोल अर्थ असेल अशा भावनेनं त्यांच्या कृत्याचा विचार करायला लोक तयार असतात. ही सवलत इतराना मिळण्यासारखी नसते, व त्यांच्या वर्तनात विसंगति दिसून आली कीं, लोकांच्या दृष्टीनं तिचा अर्थ भ्याडपणा व बेइमानी येवढाच होऊं शकतो. हा न्याय नेहमींचा ठरलेला आहे व तो माझ्या वाट्याला आला यात आश्चर्य नव्हतं. चळवळींतून अंग काढून घेतांच लोकाची किती अप्रीति मला संपादावी लागेल तें मी पुरतं जाणून होतों. परिणामाचा शक्य तितका विचार करूनच मी पाऊल टाकलं होतं. सार्वजनिक आयुष्यांतून आपल्याला कदाचित् कायमचं उठावं लागेल हें मी समजून होतों. त्यामुळें लोकमताचा जो प्रक्षोभ माझ्याविरुद्ध उठला तो मला अनपेक्षित वाटला नाहीं, व तो सोसतांना मन खंबीर ठेवतां आलं.

या दिवसांत एका प्रसगीं बॅरिस्टर जयकर याची व माझी भेट झाली तेव्हा आपण स्वतःहि महात्मा गांधींच्या चंचल धोरणानं मनातल्या मनांत कसे कष्टी व असंतुष्ट आहोत त्याचं वर्णन करून ते पुढें म्हणाले,

" फडके, Public memory is very short. ( लोकाच्या लक्षांत

फार दिवस गोष्टी राहत नाहींत. ) आज अप्रीतीची जी वावटळ तुमच्या-विरुद्ध उठली आहे ती चार-दोन वर्षात थंड होईल. आणि मग तुमचा मोठेपणा तुम्हाला परत द्यायला लोक तयार होतील. ”

त्याच्या त्या शब्दांचा खरेपणा मला पुढें सात आठ वर्षांनीं कळायचा होता. त्याच्या बोलण्यातली सहानुभूति आणि धीर मात्र मला त्या क्षणीं देखील पटण्यासारखा होता.

सपादकाची भूमिका जरी मी अल्पकाळात सोडली तरी त्यामुळें माझ्या साहित्यसेवेंत अंतर पडल नाहीं. उलट मी आता नोकरीवाचून रिकामा राहिल्यामुळें चरितार्थाच साधन म्हणून लेखन करणं मला भाग होतं. ही गोष्ट सोपी नव्हती; आणि काय करावं या विचारातच मी होतों.

अशा वेळीं अगदीं अकल्पितपणें एक गृहस्थ माझ्याकडे आले व म्हणाले,

“ जो एक ग्रंथ मराठींत लिहिला जावा अशी माझ्या आयुष्यातली तीव्र महत्त्वाकांक्षा आहे तो तुम्ही लिहा. तुम्हीच तो लिहूं शकाल. किंबहुना, माझ्या एका महत्त्वाकांक्षेच्या पूर्ततेसाटींच परमेश्वरी सूत्र हाललेलं आहे आणि तुम्ही मोकळे आहांत अस मी समजतों. ”

त्या गृहस्थांचं नांव डॉ. गणपुले. त्यांचं म्हणणं मीं ताबडतोब मान्य केलं, आणि १९२१ च्या ऑागस्टमध्यें मी असा एक ग्रथ लिहू लागलो कीं जो पुढें अगदीं एकमतानं उत्कृष्ट ठरला व ज्यायोगे मराठी साहित्यांत बहुमोल भर घातल्याचा अभिमान मीं धरला तर तें उचित होईल.

त्या ग्रंथाचं नांव ‘ मानसोपचारः शास्त्र व पद्धति. ’

१

‘ मानसोपचार : शास्त्र व पद्धति ’ या ग्रंथाचीं एकंदर छत्तीस प्रकरणं असून त्याची पृष्ठसंख्या जवळ जवळ साडेपाचशें आहे. पण हा ग्रंथ मी अवघ्या आठ महिन्यात लिहून पूर्ण केला. १९२१ च्या ऑगस्टमध्यें मी त्याच पहिलं प्रकरण लिहिलं, व ता. १९ मार्च १९२२ या दिवशीं शेवटचं. ‘ मानसोपचार ’ हें ‘ Psycho-Therapeutics ’ या इंग्रजी शब्दाचं भाषांतर आहे. मानवी शरीराच्या व्याधींचा उद्‌भव केवळ शरीर–व्यापारांतील दोषामुळें होत नसून त्यांचा मनाशीं संबंध आहे, व त्यामुळें रोगाचा परिहार करण्याच्या बाबतींत रोग्याचं मानसिक सामर्थ्य जागृत करून कामीं लावल्यास मोठा कार्यभाग होईल, या स्थूल सिद्धान्तावर उभारलेल्या उपचारपद्धतीस Psycho–Therapcutics म्हणता येईल. डॉ. गणपुले यांनीं ही उपचारपद्धति स्वीकारून आपला दवाखाना कित्येक वर्षं पुण्यास चालविला होता. त्यांचा हा उपक्रम नवीन व लौकिक समजुतींच्या विरुद्ध असल्यामुळें त्यांना उपहास, अपमान इत्यादि सर्व दशा भोगाव्या लागल्या होत्या. मिशनरी साहेबाची चेष्टा व्हावी त्या प्रकारची

त्यांची पुष्कळ चेष्टा झाली होती. "सायको व्राम" नांवाचा ब्राम तयार करून ते विकीत असत, व ज्या घरांत ते राहात त्याच्या भिंतीवर त्याची मोठमोठ्या अक्षरात जाहिरात होती. रस्त्यानं जाणारे येणारे टवाळ लोक ती सरळ वाचण्याऐवजीं "बायको साम ! बायको साम !" अशा आरोळ्या ठोकीत ! परंतु डॉ. गणपुले यानीं असल्या उपहासाला दाद न देता आत्मविश्वासान व चिकाटीनं आपल कार्य चालू ठेवलं होतं. अद्भुत चमत्कारांसारखे वाटावे असे रोगपरिहार त्यानीं प्रत्यक्ष करून दाखविले होते, व अखेर लोकमान्य टिळकासारख्या मडळीकडून प्रशस्तिपत्रं मिळविलीं होतीं.

परंतु जी उपचार–पद्धति आपण वापरतो तिचीं मूलभूत तत्त्वं आणि तिचं स्वरूप याचं ज्ञान आपल्या देशात–निदान मराठी बोलणाऱ्या आपल्या बाधवांत घरोघर पसरावं अशी त्याची तीव्र इच्छा होती, व यासाठीं या विषयावर ग्रंथ लिहवून घेऊन प्रकाशित करण्याचा ध्यास त्यानीं धरला होता. ग्रथ लिहिण्याचं मी कबूल केलं तेव्हां त्याना जो आनंद झाला त्याचं वर्णन करणं कठीण आहे.

त्यानीं या विषयावर निवडक इंग्रजी ग्रंथांचा संग्रह केला होता. ते सगळे ग्रंथ मीं प्रथम वाचून काढले. मानसशास्त्राची मला पहिल्यापासूनच फार आवड होती. त्या शास्त्राशीं या विषयाचा अगदीं निकट संबंध असल्यामुळें या ग्रंथांतहि मला फार गोडी वाटू लागली. डॉ. हडसनचें Law of Psychic Phenomena अन् Law of Mental Medicine हे दोन ग्रंथ तर मला शास्त्रीय विषयावरील सुसंबद्ध व सुगम लिखाणाचे आदर्श वाटले. गणपुल्याच्या संग्रहातील सर्व ग्रथाचं वाचन मी अल्पावधींत संपविलं. जो मराठी ग्रंथ लिहायचा तो शक्य तेवढा निर्दोष करण्याच्या हेतूनं आपल्या वैदिक वाङ्मयांत, उपनिषदांत, व योगसूत्रात या विषयाशीं जिचा सबध दर्शवितां येईल अशी जी माहिती सापडेल ती वापरण्याचं मीं ठरविलं. ती गोळा करायला मला मुळींच श्रम करावे लागले नाहींत. कारण ती घरातच तयार होती. माझे वडील वेदान्तविषयांत पारंगत होते, व त्यांच्याशीं चर्चा करून मला माहिती तर अनायासानं मिळालीच, पण शिवाय इंग्रजी ग्रंथातील प्रतिपादनाशीं तिचा समन्वय कसा करता येईल

याबद्दलचीहि दृष्टि मला आली. इतकी तयारी झाल्यावर मी ग्रंथाच लेखन सुरू केल, अन् जो लिहीत गेलो तो अखेरच्या 'समाप्त' पर्यंत. येवढा मोठा साडेपाचशे पानाचा ग्रथ, पण मी तो अगदी एकटाकीं लिहून काढला. याचीं कारण दोन. एक विषय मला स्वच्छ समजला होता व मनोमय पटला होता; अन् दुसर, ग्रथाचा आराखडा अगदी पहिल्यापासून मी मनाशीं निश्चित केला होता.

या कारणामुळेंच माझी जात्याच सुबोध व प्रवाही लेखनशैली या पुस्तकात अगदीं प्रकर्षान प्रगट झाली. मला तर अस वाटत कीं या ग्रंथाच लेखन म्हणजे त्या वेळीं हलके हलके बनत चाललेल्या माझ्या लेखन-शैलीला मोठी नामी संधि मिळाली. वेधाशीं घर्षण करता करता शस्त्राला धार चढावी तद्वत् शास्त्रीय विषयावर घासता घासता माझ्या प्रतिपादन-शैलीला निर्मलपणा आणि भाषेला सुगमता व ओघ हे गुण प्राप्त झाले. या गुणाच्या योगानच तो ग्रथ शास्त्रीय असूनहि व त्याची किंमत चार रुपये असूनहि एखाद्या कादबरीसारखा तो झपाट्यानं खपला.

माझ्या या कामगिरीबद्दल कृतज्ञता दाखविण्यात डॉ. गणपुले यांनीं यत्किंचित्‌ही कसूर केली नाहीं. लेखनाचा मोबदला म्हणून त्यांनीं आठशें रुपये तर मला दिलेच, पण प्रेमाचा आहेर म्हणून पंच्याऐशीं रुपये किंमतीचं सोन्याचं घड्याळही दिल. मी मनगटावरच सोनेरी घड्याळ उभ्या आयुष्यात वापरल ते हेंच एक.

"मानसोपचार" ग्रथाचं प्रकाशन आर्थिक दृष्ट्या कल्पनेपलीकडे यशस्वी झाल्यामुळें डॉ. गणपुले यानी माझ्यामाग सारखा लकडा लावला, कीं या विषयावर अजून पुष्कळ माहिती लोकांना देण्यासारखी आहे, आणखी एक ग्रथ लिहा. परंतु त्यांची विनति मी मान्य केली नाहीं. "मानसोपचार" लिहावयास मी १९२१ सालीं तयार झालो तो बऱ्याच अंशीं त्या वेळच्या माझ्या बेकारीमुळें. ती आपत्ति माझ्यावर पुन्हा यायची होती, व तीं आल्यावर डॉ. गणपुल्यासाठीं आणखी एक ग्रंथ मी लिहिणार होतो. पण त्या योगायोगाला अजून चार वर्षाचा अवधि होता.

'मानसोपचार' हे पुस्तक मी एकटाकी लिहिल हें खरं; परंतु तें लिहिण्याच्या सबंध कालावधींत मी पुण्यासच होतों अस नव्हे. त्या पुस्तकाचं

पहिलं प्रकरण मी १९२१ च्या ऑगस्टमध्यें लिहिलं, अन् लगेच सप्टेंबर महिन्यात मी दिल्लीस गेलो.

दिल्लीच्या ' सेंट स्टीफन्स ' नावाच्या प्रख्यात कॉलेजांतील तत्त्वज्ञानाच्या प्रोफेसरची जागा मला मिळाली, व तिकडे मी रवाना झालों. बनारसच्या संगीत परिषदेस गेलो असताना दिल्ली-आग्र्याची मुशाफरी मीं केली होती. त्या वेळीं जर दिल्लीचा एखादा इसम मला म्हणाला असता कीं दोन वर्षांनीं इथल्या कॉलेजांत प्रोफेसर म्हणून तुम्ही याल तर ते मला खर वाटल असत काय ? पण तसं झालं. माझ्या आयुष्यात असा चमत्कार इतके वेळां घडलेला आहे की आपली लहानमोठीं सुखदुःख योगायोगावर अवलंबून असतात अशी माझी खात्री होऊन चुकली आहे. 'केवळ' योगायोगावर अस मी मानीत नाहीं हं ! मी जबरदस्त प्रयत्नवादी-हट्टी आहे. पण प्रयत्न करूनही फल हुकल किंवा थोडासाच प्रयत्न करून ' देतां किती घेशिल दो करानीं ? ' अशा मापानं भाग्य उघडल, तरी मला आश्चर्य वाटत नाहीं. दोन्ही न्याय सृष्टीत आहेत हें मला माहीत झाल आहे. दोहोंची तयारी माणसानं ठेविली पाहिजे हें तत्त्व माझ्या आयुष्यानं मला शिकविलं आहे. यालाच मी ' कर्मयोग ' समजतों. Healthy Cynicism असंही या वृत्तीचं वर्णन करता येईल. ही वृत्ति फार हिताची आहे अस मी अगदीं निःशंकपणें सांगेन, " जीविताकडे पाहण्याची माझी दृष्टी " या विषयावर सुमारें तीन वर्षांपूर्वी रेडिओवरून जे भाषण मी केल, त्यांत माझ्या याच मनोवृत्तीचं स्वरूप मी विषद केलं होत. ही माझी वृत्ति बनावयास ज्या घटना कारण झाल्या त्यांतच 'सेंट स्टीफन्स' कॉलेजांतील मोठ्या पगाराची जागा मला अचानक मिळाली या गोष्टीची गणना करावी लागेल.

दिल्लीस पोंचतांच कॉलेजचे प्रिन्सिपल रुद्र यांच्या भेटीला गेलों तेव्हां त्यांनीं प्रवास कसा काय झाला वगैरे कुशल प्रश्न केले, माझ्या कामाची मला समजूत दिली, अन् मग विचारल,

" तुम्ही इथें राहण्याची वगैरे व्यवस्था काय केली आहे ? "

मीं म्हटलं, " अजून काहींच नाहीं."

ते म्हणाले, " मग माझ्याकडेच राह्यलां कां येत नाहीं तुम्ही ? "

हा प्रेमळ प्रश्न अत्यंत अनपेक्षित होता. मी गोंधळून गप्प राहिलों.

तोंडातला चिरूट दूर करून ते म्हणाले;

" Are you a vegetarian ? "

मी म्हटल, " Yes. But not a bigotted one ! "

ते हसले व चटकन् म्हणाले, " मग तुम्ही माझ्याकडे राहायला याच. संकोच करूं नका. तुम्ही इतक्या दूरच्या परप्रातातून आलात. तुमच्या सुख सोयी मला पाहिल्या पाहिजेत."

मग मी आढेवेढे घेतले नाहींत. मीं माझं सामान ठेवल होतं तेथून घेऊन आलो. अन् कॉलेजात प्रोफेसर म्हणून दाखल होण्याच्या आधीच प्रिन्सिपल रुद्र याच्या घरांत खर्च देऊन राहणारा पाहुणा नात्यानं प्रवेश केला.

दिल्लीच्या मुक्कामातला माझा दिनक्रम फार सुदर होता. कॉलेजची वेळ सकाळीं नऊ ते दुपारी एकपर्यंतची असे. कॉलेजला जाण्यापूर्वी 'छोटी हजेरी' ( छोटी कसली, चागली ढेकर येईपर्यंत बडी हजेरी ) व्हायची, नतर कॉलेज सुटल्यानतर दुपारचा खाना व्हायचा. नंतर एक तासभर विश्राति झाली, कीं सुदर हिरवळीच्या कोर्टसवरचं टेनिस जे सुरू व्हायचं तें सूर्यास्तापर्यंत. म्हणजे साडेचार पांचपर्यंत. कारण उत्तर हिंदुस्थानातील हिवाळ्याच्या आरभीचे दिवस होते ते ! मग रात्री पुन्हा बडा खाना व्हायचा ! बी. ए.चे तत्त्वज्ञानाचे वर्ग मी न्यू पूना कॉलेजांत असताना घेतले होते. पण दिल्लीच्या कॉलेजात मला एम्. ए.चेहि वर्ग घ्यावे लागत. या व्याख्यानाची तयारी करण्यासाठीं मी रोज अडीच तीन तास वाचन करीत असे, आणि शिवाय 'मानसोपचार' ग्रंथाचं लेखन मी अखड चालू ठेवलंच होत. खूप वाचाव, खूप लिहाव, खूप खेळावं, खूप खावं असा दिनक्रम चालू झाला. आणि या दिनक्रमाच्या आनंदांत फारच मोठी भर घालणारी एक गोष्ट मला मिळाली होती ती म्हणजे प्रिन्सिपल रुद्र यांचा सहवास.

हे गृहस्थ बंगाली ख्रिश्चन होते. खरी ख्रिश्चन वृत्ति त्यांच्या ठिकाणी पूर्णपणें बिंबलेली होती. धर्माचा खरा अर्थ त्याना कळला होता, व तो त्याच्या वागण्यात बोलण्याचालण्यांत मला पदोपदीं दिसून येई. कमालीची सहिष्णुता, उत्कट परोपकारदक्षता, आणि अढळ आनदी वृत्ति व शांति या गुणाचं ध्येय सतत नजरेसमोर ठेवून ते चालत आहेत हें मला थोड्याच

दिवसांत कळून आलं. त्यांच्या ठिकाणीं विनोदबुद्धीही फार मोठ्या प्रमाणात होती, व रोज रात्री जेवणाच्या वेळी त्याच्या गोष्टीवेल्हाळपणाला भरती येई आणि आमची हसतां हसता पुरेवाट होई. मग कधी राजकारणाच्याही गप्पा निघत. त्याचा व गांधींचा चांगलाच स्नेह होता. इतका कीं गांधी दिल्लीस आले कीं त्यांचा मुक्काम रुद्राच्या बंगल्यावर असे. पण गांधींची राजकारण-विषयक मतं रुद्रांना बिलकुल संमत नव्हती. जेवणाच्या वेळीं हा विषय निघाला, कीं ते गांधींच्या मतावर सडकून टीका करायचे, व म्हणायचे, "मला गांधी भेटला कीं दर वेळी मी त्याला त्याच्या तोंडावर सांगतों हें सगळं."

त्यांच्या या सडेतोडपणाचा व त्यांच्या आणि गांधींच्या दाट स्नेहभावाचा प्रत्यक्ष पुरावा मला एकदा चांगलाच पहावयास मिळाला.

गांधी दिल्लीस आले व आमच्या (म्हणजे रुद्राच्या!) बंगल्यातच उतरले. गांधींनीं त्या सुमारास 'यंग इंडिया' मध्यें संततिनियमनावर लेख लिहून गर्भप्रतिबंधक कृत्रिम उपायाचा तीव्र निषेध केला होता, व अल्प संतति व्हावी यासाटीं पतिपत्नींनीं कडक ब्रह्मचर्यानं राहावं असं प्रतिपादलं होतं.

संभाषणाच्या ओघात प्रि. रुद्र यांनीं गांधींच्या या लेखाचा विषय काढला व त्यांचं प्रतिपादन किती अव्यवहार्य आहे तें दाखवून द्यायला सुरुवात केली. गांधी हट्टी व वादपटु. ते काय आपलं म्हणणं परत घेतात? पतिपत्नींनी ब्रह्मचर्य व्रताचं पालन केलंच पाहिजे हे पालुपद ते कांही केल्या सोडीनात. शेवटीं प्रि. रुद्र यांनी मुद्दे काढायचं सोडून मिस्किलपणें हंसत म्हटलं,

"ब्रह्मचर्य, ब्रह्मचर्य! तुला काय लागतंय ब्रह्मचर्याच्या गोष्टी शिकवायला! पन्नाशी झाली तुझी, अन् अर्धा डझन मुलं झालीं तुला तेव्हा करतो आहेस हा उपदेश! पण बाबा, तूं हें विसरतोस कीं या देशांतली अर्धी लोकसंख्या कुणाची आहे, तर ऐन विशी—पंचविशींतल्या स्त्रीपुरुषांची! त्यांचा विचार कर जरा!

सरळ वैयक्तिक हल्ला होता हा. पण तें बोलणं ऐकतांच गांधी मोठमोठ्यानं हसूं लागले.

निरुत्तर होताच स्मित किंवा हास्य करण्याची त्यांची ही युक्ति मला कांहीं अगदींच अपरिचित नव्हती!

## १०

माझ्या दिल्लीच्या मुक्कामांत ' मानसोपचार ' पुस्तकाचं लेखन तर मी झपाट्यानं केलच, परंतु शिवाय ज्या गोष्टीचा पुढील साहित्यसेवेंत मला निःसंशय उपयोग झाला अशा पुष्कळशा गोष्टी घडल्या. एक तर पुष्कळशा इंग्रजी कादबऱ्या मीं वाचून काढल्या; आणि याहूनहि अधिक महत्त्वाची गोष्ट ही कीं, इंग्रजी व मुसलमानी राहाणीचं अवलोकन मला करायला मिळालं.

स्टीव्हन्सन्, लॉक्, गार्डिनर, बर्नार्ड शॉ, वेल्स हे ग्रंथकार मी विशेष आवडीन वाचले, व त्यांचीं पुस्तक वाचताना माझ्या मनांत सारख येऊं लागल कीं, इंग्रजी भाषेत जी सफाई व लवचिकपणा आहे तो मराठींत कां आणतां येऊं नये. मराठी साहित्याचं वाचन मी पद्धतशीरपणानं केलेलं नव्हतं, पण पुष्कळ केल होतं. उपरोक्त ग्रंथकारांचं लिखाण जो जो मनाला मोह घाली तो तों वाटे, ही मोहकता आपल्या भाषेत नाहीं. टिळकाचं चरित्र लिहिण्याच्या उद्देशानं त्याचे 'केसरीं'तले अग्रलेख मी लक्षपूर्वक वाचले होते. ते वाचतांना त्याच्या भाषेमागं कळकळीची प्रचंड ज्योति

असल्याचा प्रत्यय खचित येई; तथापि तिच्यात आधुनिकता आहे असं वाटत नसे. ताजेपणा, खेळकरपणा, स्वैरता इत्यादि गुण मला फक्त तात्यासाहेब केळकरांच्या लेखनांत काही अंशान दिसत; परंतु त्यांची देखील लेखणी जुन्या काळात रंगाळत आहे असं पदोपदीं वाटे. मराठी भाषेवर आधुनिक संस्कार अद्याप व्हायचे आहेत असं मनात येई, आणि मग वाटे आपण स्वतः या दृष्टीन जोराचा प्रयत्न करून पाहावा.

बर्नर्ड शॉ याच्या पुस्तकाचा ज्यानीं चागला अभ्यास केलेला आहे अशी मडळी मला पुष्कळदा एक विचित्र कबुली देतात. मी जेव्हां त्याना विचारतो, "शॉची 'Irrational Knot' ही कादंबरी तुम्हाला कशी काय वाटली?" तेव्हा ते आश्चर्य दाखवून म्हणतात. "शॉची या नांवाची कादंबरी आहे? आपल्याला माहीत नव्हत बुवा!" कॉलेजच्या ग्रथालयात देखील शॉचीं बाकी सर्व पुस्तक असावीत पण 'Irrational Knot' ही कादंबरी सांपडूं नये असा अनुभव मला आला आहे. असं कां असावं कळत नाही. ही कादबरी मी प्रथम दिल्लीस वाचली तेव्हां मला फार आवडली. ती अस्सल शॉ छापाच्या विचित्र पात्रानीं भरलेली आहे. उदाहरणार्थ, त्यातली 'एलिनॉर' एके ठिकाणीं म्हणते, "You never see people in all their selfishness until they pretend to love you!" प्रतिष्ठा आणि प्रेम याच्यातील विरोधावरच कादबरीचं कथानक आधारलेलं आहे. नायिकेवरचं आपल प्रेम व्यक्त करण्याकरता माझ्याशीं तू विवाह करशील काय असं विचारण्याकरता नायक जे एक विस्तृत पत्र तिला लिहितो तें तर अत्यंत मार्मिक, व सडेतोड विचारांचा सुदर नमुना ठरेल. शॉच्या कोणत्याहि नाटकाचं वाटल नाही इतकं या कादंबरीच आकर्षण मला वाटलं मनांत सारखं येऊं लागलं, कीं मराठी कादंबरींत या तऱ्हेची चित्तवेधकता आली पाहिजे.

याच सुमारास एच्. जी. वेल्स यांची 'Ann Veronica' ही कादंबरी माझ्या वाचण्यांत आली, व तिनं तर माझ्या मनाची फारच पकड घेतली. आयुष्यांत जिला धैर्यानें झगडावं लागलं अशा एका तरुण मुलीची ही गोष्ट आहे. तिच्यातलीं स्वभावचित्रं फारच कुशलतेनं रंगविलेलीं आहेत. पात्रांच्या

संभाषणांत अगर निवेदनांत असे सुदर मार्मिक विचार विखुरलेले आहेत कीं काही विचारू नका. उदाहरणार्थ, "One must have young people just as one must have flowers" किंवा "One has got to be a better man than one's father, or what is the good of sucecessive generations?" किंवा "They say there are spots on the sun, Not for me! It warms me, and lights me, and fills my world with flowers. Why should I peep at it through smoked glass to see things that dont't affect me?" आणि कादंबरींतील मध्यवर्ति कल्पना व्यक्त करणारे पुढचे उद्गार तर अतिशयच सुंदर आहेत.

"Life is two things mixed and muddled up together. Life is morality--life is adventure. Morality tells you what is right, and adventure moves you. If morality means any thing, it means keeping bounds. If individuality means anything it means breaking bounds—adventure. Will you be moral and your species, or immoral and yourself?

Thereis no sense in morality unless you are fundamentally immoral.

माझ्या जुन्या डायरींत पाहून त्यातील नमुने म्हणून हे तीनचार उतारे दिले. ( हे निवडतांना माझ्या मनात आलं, त्या काळीं माझ्या वाचनात आलेल्या सुंदर लिखाणाची मी किती मुबलक नोंद ठेवीत असे. माझ्या सध्याच्या लेखनाचा व्यापामुळें माझ्या डायरीचीं पानं अलीकडे कोरी राहतात हें एक नुकसान म्हणायचं ! )

अलीकडे अलीकडे एच्.जी. वेल्स याच्या कादंबरी-लेखनाला रूक्ष स्वरूप येत गेलेल आहे, व ललितलेखक म्हणून त्याच्यावरची माझी भक्ति उडाली आहे. परंतु, त्याच्या लेखणीचा ललितविलास तेव्हां ऐन भरात होता. 'Ann Veronica' आवडल्यामुळें त्याच्या 'Love and Mr. Lewisham', 'Secret Places of the Heart' इत्यादि आणखीहि कादंबऱ्या मीं वाचल्या. या सर्व वाचनाचा परिणाम होऊन अगदीं आधुनिक भाषा-शैलीनं कादंबरीलेखन करता येत का पहावं असं मी मनाशीं ठरविलं, आणि

१९२२ च्या मार्च महिन्यांत एका नव्या कादंबरीचं पहिलं प्रकरण मी लिहून काढलं. या कादंबरीचं नाव 'कुलाब्याची दाडी'!

अशा प्रकारें एकीकडे प्रत्यक्ष लेखन करीत असतांना पुढें माझ्या कादंबरी लेखनांत ज्या साहित्याचा मला फार उपयोग झाला असं साहित्यही मी अजाणतां गोळा करीत होतों.

दिल्लीस असताना आजूबाजूच्या टापूंत मीं बराच प्रवास केला. अमृतसरपर्यंत मीं हिंडून आलों, आणि उच्चवर्णीय मुसलमानी संस्कृतीचं एक केंद्र जे अलीगढ शहर तेथें पुष्कळ वेळा गेलों. कॉलेजात माझ्या विद्यार्थ्यांपैकीं बरेचसे विद्यार्थी खानदानी मुसलमान घराण्यातले होते. मीं त्यांच्यांत पुष्कळ मिसळत असे. ते मला आपल्या घरीं वारवार जेवायखायला बोलवीत व आपल्या घरांतील माणसाचा परिचय करून देत. त्याच्या सहवासामुळें मी थोडी उर्दू भाषाहि शिकूं लागलो. (पुढें पुण्यास असताना एका प्रसिद्ध मौलानाच्याजवळ मी त्या भाषेचा थोडासा पद्धतशीर अभ्यासहि केला.) मुसलमानी घराण्यांत ज्या गोष्टी मीं पाहिल्या त्याचा 'अटकेपार' ही कादंबरी लिहिताना फार उपयोग झाला. आणि दिल्लीस असताना भोंवतालच्या प्रदेशात केलेली मुशाफरीहि कादंबरी-लेखनाच्या दृष्टीनें मला फायद्याची झाली. 'जादूगार', 'दौलत' या कादंबऱ्यांनीं लोकांचं चित्त एकदम वेधलं याचं एक कारण खुद्द महाराष्ट्राबाहेरच्या दूरदूरच्या स्थळाची आकर्षक वर्णनं त्यात होतीं हें होय. या वर्णनाची बरीचशी तयारी मी दिल्लीस असतांना नकळत होत होती.

आणि याखेरीज कादंबरीलेखनास उपयुक्त असं आणखी एक गमतीचं साहित्य मी आपोआप गोळा करीत होतो. तें म्हणजे युरोपियन स्त्रीपुरुषाचे चित्रविचित्र नमुने.

माझ्या पुष्कळशा कादंबऱ्यात एकेक युरोपियन पुरुषाचं अथवा स्त्रीचं पात्र आहे. हीं पात्रं गौण असूनहि त्याची आठवण वाचकाला विशेष राहते. 'प्रवासीं'तील जर्मन तरुणी 'मॅगडा शूबेर्ट' हिच्या स्वभावचित्रावर तर वाचकं फार खूष झाले होते. कादंबरीच्या कथानकांत एक युरोपियन पात्र आणायचं हा माझ्या लेखनतंत्राचा एक भाग कांहीं काल होता, व त्या काळातल्या माझ्या कादंबऱ्याची आकर्षकता काहीं अंशानं त्यावर अवलंबून होती.

माझ्या कादंबऱ्यांत आलेल्या युरोपियन स्त्री-पुरुषांचीं स्वभावचित्रं मी चांगली रंगवूं शकलो याचं कारण त्याचे रीतिरिवाज, त्याची ज्ञानलालसा, त्यांची विचारसरणी इत्यादि गोष्टींचा दिल्लीच्या मुक्कामांत मीं प्रत्यक्ष अनुभव घेतला हेंच म्हटलं पाहिजे.

दिल्लीच्या सेंट स्टीफन्स कॉलेजचे प्रिन्सिपल रुद्र बंगाली ख्रिश्चन होते. त्यांच्या हाताखालच्या अध्यापकवर्गात पाच सहा इंग्रज गृहस्थ होते. मला लवकरच दिसून आलं कीं, हे सारे इंग्रज प्रोफेसर प्रिन्सिपल रुद्र याचा वरिष्ठ अधिकार अगदीं तत्परतेनं मान्य करून कॉलेजच्या नित्यनैमिक कामांबद्दलचे त्यांचे हुकूम यत्किंचितहि तक्रार न करतां पाळीत. पिन्सिपल रुद्र यांना कॉलेजातील सर्व मडळीं 'Burra Sab' अशा काहींशा आदराच्या व काहींशा सलगीच्या टोपण नावानं ओळखीत असत. रूद्रानीं काढलेला एखादा हुकूम वावगा दिसण्यासारखा असला म्हणजे आम्हां अध्यापकांच्या खोलींत त्यावर साहजिकच जी टीका होई तिच्यात हे इंग्रज प्रोफेसर सामील होत, आपल्या मार्मिक विनोदानं ते आम्हाला हसवीतही. परंतु विनोद आणि चर्चा संपल्यावर 'Bnt any way Bura Sab's word has to be respected.' हे त्यांचे उद्गार ठरलेले असत. कॉलेजच्या राज्यकारभारात शिस्त राखण्याची त्याची तत्परता मला अतिशय कौतुक करण्यासारखी वाटे. स्वतःच्या गोऱ्या कातड्याचा अभिमानत्या तत्परतेच्या आड ते कधीहि येऊं देत नसत.

मात्र खाजगी बैठकींत त्यांचा तो अभिमान दुप्पट उसळी मारून वर येई. ते इंग्रज प्रोकेसर आपल्या बायकांमुलांसकट प्रिन्सिपल रुद्र याच्याकडे जेवायला पुष्कळदा येत, व आपल्या घरीं आम्हालाही वारंवार बोलवीत. अशा खान्यांच्या वेळीं गप्पागोष्टींना कधीं कधीं गभीर वादविवादाचं स्वरूप येत असे, आणि हिंदुस्थानच्या राष्ट्रीय अकांक्षाचा विपय त्यात अनेक वेळां निघत असे. मग ते इंग्रज प्रोफेसर आपल्या जातीचीं अस्सल अरेरावी भाषा बोलूं लागत, रुद्राच्याकडे पाहून 'You Indians' असं म्हणायला ते कमी करीत नसत, आणि सिव्हिल सर्वटांनीं व मिशनऱ्यानीं केलेल्या हिंदुस्थानच्या वर्णनातून पाठ केलेलीं वाक्यं घडाघड म्हणून दाखवीत. इंग्लंड म्हणजे एक शुद्ध ठगाचा देश असून केवळ शौर्याच्या जोरावर

इंग्रजांनीं एकहि देश जिंकलेला नाहीं याचे ऐतिहासिक पुरावे आम्हालाही मुखोद्गत असत व आम्ही त्याना अगदीं भरभक्कम उलट अहेर प्रत्येक वेळीं करीत असू. प्रिन्सिपल रुद्रानीं तर एकदां स्पष्ट असे उद्गार काढले,

"तुमच्या गमजा आजपर्यंत चालल्या, परंतु आतां आम्ही हिंदी लोक पुरते जागे झालो आहोंत आणि जगातहि तुमची पत उरलेली नाहीं. वीस वर्षांत आम्ही तुम्हाला पार हाकून देतो कीं नाहीं बघा."

आणि रुद्राच्या त्या खणखणीत धमकावणीला त्या इंग्रज प्रोफेसरांपैकीं एकानं लगेच उत्तर दिलं,

"हें पाहा, तुम्ही जागे नव्हे महाजागे झालांत तरी इंग्रजांची संपूर्ण हकालपट्टी तुम्ही करू शकणार नाहीं. राज्यकर्ता म्हणून नव्हे, तर धाडसी मुशाफीर म्हणून इंग्रज मनुष्य हिंदुस्थानांतच्च काय, जगाच्या चाहेल त्या भागात सदैव राहील. तो त्याचा जन्मसिद्ध हक्क अहे."

त्या इंग्रज प्रोफेसराचे हे उद्गार फार अर्थपूर्ण नाहींत काय?

असल्या बोलण्याचालण्याची अगदीं मोकळेपणानं खातापितांना गंमत चाले. त्या इंग्रज स्त्रीपुरुषांचा स्नेह झाल्यान त्याच्या गुणदोषाचं नीट अवलोकन करण्याची मला चागली संधि मिळाली, व तिचा मीं पुरेपूर फायदा घेतला.

त्या मडळींत अर्थशास्त्राचे एक प्रोफेसर होते. त्यांची बहीण हिंदुस्थान देशाचा अभिमान धरणारी होती. तिनं संगीत व चित्रकला या विषयांच्या परीक्षा दिल्या होत्या व हिंदी सगीताचा व चित्रकलेचा अभ्यास करण्यासाठीं ती इकडे आली होती. इग्लंडमध्यें असल्यापासूनच बंगाली लोकाचा व तिचा विशेष परिचय झाला असल्यामुळें बंगाली चित्रकाराची चित्रकला व बंगाली लोकांचं संगीत यापलीकडे हिंदुस्थानांत निराळी चित्रकला अथवा संगीतपद्धति नाहीं अशी या तरुण इग्रज स्त्रीन कल्पना करून घेतली होती. तिच्या कल्पनेवर एकदां मी अतिशय जोराचा हल्ला केला. पडवळासारख्या हातापायाच्या व बुबुळें बाहेर निघालेल्या भयानक डोळयांच्या बंगाली चित्रातील त्या स्त्रीपुरुषाकृतींची जेव्हा मी अगदीं मर्यादा न ठेवता टर उडविली, आणि बगाली लोकात प्रसृत असलेल्या सगीताचा दर्जा किती खालचा आहे तेंहि सरळ सागितल, तेव्हा ती म्हणाली,

" माझी समजूत किती चुकीची होती तें मला कळलं. पण केवळ ती चूक दाखवल्यानं तुमचं काम सपलं असं समजूं नका."

मीं तिच्याकडे प्रश्नात्मक दृष्टीनं पाहिल असलं पाहिजे. ती पुढें म्हणाली " माझी चूक दुरुस्त करण्यांत तुम्ही मला मदत करायला नको ? "

मीं म्हटलं, " मी तशी प्रत्यक्ष मदत कांहींच करू शकणार नाही. कारण मी स्वतः चित्रकारहि नाहीं किंवा कलावंतहि नाही."

" नसाल. परंतु या विषयावर तुमच्याशीं नुसत्या गप्पा मारल्या तरी माझा फायदा होईल येवढं मला कळतं."

मग आमच्या संगीतविषयक गप्पा वारंवार होऊं लागल्या.

एकदा संभाषणाच्या ओघात नृत्याबद्दलच बोलण निघालं तेव्हां ती एकदम थबकून मला म्हणाली,

" माझी पुष्कळ दिवसांची एक इच्छा तुम्हीं पूर्ण केली पाहिजे. एका प्रवासवर्णनाच्या पुस्तकांत मीं वाचलं आहे कीं, या दिल्ली शहरात नाचणाऱ्या तरुण मुली आहेत, व त्यांचं नृत्य पहाण्यासारखं असतं. तुम्ही मला तें दाखविल पाहिजे."

मी म्हटलं, " बाप रे ! तुम्ही काय बोलता त्याची तुम्हांला कल्पना आहे. का ? तें नृत्य पाहण्यासाठीं किती भलत्या जागीं जाव लागेल याची तुम्हाला थोडीशी जरी माहिती असती तरी तुम्ही अस बोलला नसतां."

" मला माहीत आहे, कीं त्या नर्तिका बाजारपेठेंत राहतात. परंतु मला जर त्यांचं नृत्य अभ्यासासाठीं खरोखर पाहायच असेल तर त्या ठिकाणीं जाण्यांत मला भीति अगर अप्रतिष्ठा कां वाटावी ? वाटलं तर मी आपल्या भावाला सरळ विचारीन व मी, तो आणि तुम्ही असे आपण तिघे मिळून जाऊ."

मीं मनाशीं म्हटलं, तुझ्या ज्ञानलालसेपुढें नमस्कार असो, बया !...

अशा प्रकारें इंग्रज माणसाच्या स्वभावाचे गमतीदार नमुने मला दिल्लीस असतांना पाह्यला मिळाले. तिथल्या मुक्कामात 'मानसोपचार' ग्रंथ व 'कुलाब्याची दाडी'चीं पहिली काहीं प्रकरणं येवढंच प्रत्यक्ष लेखन मी करूं शकलों, तरी पुढच्या कित्येक कादंबऱ्यांतल्या स्थलवर्णनाची व स्वभावचित्रांची सामग्री माझ्याजवळ तयार झाली !

## ११

दिल्लीची माझी नोकरी कायमची नव्हती. सेंट स्टीफन्स कॉलेजातले तत्त्वज्ञानाचे कायमचे प्रोफेसर अभ्यासासाठीं रजा घेऊन युरोपला गेले होते, व त्याच्या गैरहजेरींत त्यांचं काम करण्यासाठीं मला घेण्यात आलं होत. अर्थात् दिल्लीची ती नोकरी पत्करतांना तिथें स्थिर होण्याच्या कल्पनेनं मी गेलोंच नव्हतों; परंतु, हें खरं असूनहि दिल्ली सोडताना मला वाईट वाटलं. पुण्या–मुंबईच्या आवाढव्य कॉलेजांच्या तुलनेनं 'सेंट स्टीफन्स' हे दिल्लीचं फार नामांकित खरं पण फार छोटं कॉलेज होतं. परंतु कॉलेज लहानसंच असलं म्हणजे अध्यापक व विद्यार्थी यांजमध्यें अधिक निकट संबंध येतात. शिवाय, परप्रांतीय अध्यापक असला कीं विद्यार्थी प्रथम प्रथम त्याला दूर ठेवून पारखीत असले तरी अशा दूरस्थ अध्यापकाविषयीं विद्यार्थ्यांच्या मनात एकदां आवड उत्पन्न झाली कीं तो त्याना इतरांपेक्षां जास्त हवासा वाटूं लागतो. सेंट स्टीफन्स कॉलेजांत मी एकटाच महाराष्ट्रीय प्रोफेसर होतों, व त्यामुळें महाराष्ट्रीयाचे आचारविचार, मराठ्यांची भाषा, आणि मराठ्यांचा इतिहास समजून घेण्याच्या कुतूहलानं विद्यार्थी माझ्या

कडे अधिकच आकृष्ट होत असत. मी क्रिकेट व टेनिस खेळत असल्यामुळें त्यांच्यात मिळून मिसळून वागण्याची संधि मला फार मिळे. हॉकीचा खेळ मी खेळत नसे परंतु कॉलेजची मॅच असली कीं, विद्यार्थ्यांत मिसळून ती पाहिल्यावांचून मी राहात नसे. अद्वितीय हॉकी खेळणारा म्हणून ज्यानं सबंध जगाचं प्रशंसापत्र पुढें मिळविलं त्या ध्यानचंदाचा खेळ मी दिल्लीस असतांनाच प्रथम पाहिला. विद्यार्थ्यांबरोबर मी खेळत असे, वनभोजनाच्या सफरी निघाल्या कीं त्यांत सामील होत असे, निरनिराळ्या विषयावर त्यांचे व माझे निकराचे वाद होत असत. अशा प्रकारें तिथले दिवस घालविल्या-मुळें दिल्ली सोडतांना मला फार वाईट वाटलं. विद्यार्थ्यांनीं मला निरोप देण्यासाठीं सभा भरविली तींत भाषण करतांना प्रत्येकजण माझ्याकडे वळून म्हणे, 'तुम्ही चाललात. आम्ही तुम्हाला विसरणार नाहीं. तुम्हीहि आमची आठवण ठेवा.' माझ्या हाताखाली एम्. ए.च्या वर्गात उत्तमसिंग नावाचा एक प्रौढ शीख विद्यार्थी होता. कशीद्यानं ज्यावर जाईचीं नाजूक फुलं भरलीं आहेत असं एक वस्त्र माझ्या हातीं देऊन तो म्हणाला, 'मेरे प्यारे पंडितजी, आपणाला आठवण म्हणून देण्यासाठीं घरून माझ्या पत्नीकडून हें वस्त्र मी मुद्दाम तयार करवून आणलं आहे!' हा विद्यार्थी अमृतसरचा होता. पुढें पुष्कळ वर्षं तो मला नियमानं लिहीत असे व प्रत्येक पत्रांत तो विचारी, 'माझ्या घरीं यायचं तुम्हीं मला वचन दिलेलं आहे. केव्हां येणार?' मी त्याला दर वेळीं उत्तर लिही, 'इतक्यात नाहीं पण केव्हां तरी येणार खास.' आता त्याचा माझा पत्रव्यवहार नाहीं. तथापि मी मनाशीं पुष्कळदां म्हणतों, 'आपल्याला एकदां अमृतसरला जायचं आहे.'

दिल्लीहून परत पुण्याला आल्यावर डॉ. गणपुल्यांचा पुन्हा आग्रह सुरू झाला कीं, 'मानसोपचारा'च्या पुढचा ग्रंथ लिहा. त्या पुस्तकाच्या शेवटच्या प्रकरणात या दुसऱ्या आगामी ग्रंथाचा उल्लेख होता. त्यामुळें डॉ. गणपुल्यांना पत्र लिहून वाचक विचारीत कीं, 'फडक्यांकडून पुढच पुस्तक तुम्ही केव्हा लिहून घेणार? आम्ही वाट पाहत आहोंत.' डॉ. गणपुले हीं पत्रं माझ्यापुढें टाकीत आणि म्हणत, "इतक्या लोकाची निराशा किती दिवस करणार तुम्ही?"

एकदां मीं म्हटलं, "माझं चुकलंच थोडसं."

त्यांनीं विचारलं, “ चुकलं ? तें काय ? ”

“ ‘मानसोपचार’ इतकं चांगल होऊ द्यायला नको होतं मी.”

यावर ते हसले. पण लगेच गभीर मुद्रा करून म्हणाले, “ तें कांहीं नाहीं, आतां लवकर लिहा दुसरं पुस्तक.”

मी त्यांच म्हणण ऐकून त्याना हव तें दुसरं पुस्तक लिहायला आरंभ केलाहि असता; परंतु दोन गोष्टी आड आल्या.

एक अशी कीं, आप्पासाहेब गोखले व मी मिळून एक निराळीच योजना त्या सुमारास आखीत होतो व तिच आकर्षण मला अधिक वाटत होतं. ती योजना म्हणजे एक नव सुदर मासिक काढण्याची.

आप्पासाहेब गोखल्यांनी आता ‘जगद्धितेच्छु’ छापखाना सोडला होता व बरंच मोठं भाडवल जमवून ‘विजय प्रेस’ नांवाचा स्वतःचा छापखाना सुरू करून अल्पावधींत तो नांवलौकिकास आणला होता. आप्पासाहेब गोखले छपाईच्या धद्यात वाकबगार तर होतेच, पण इतर कोणी करीत नाहीं अस काही विशेष करून दाखवाव अशी ईर्षा धरणारे ते एक महत्त्वाकाक्षी गृहस्थ होते. आम्ही दोघे मिळून मासिकाचे बेत अगदीं जोरान करू लागलो. माझ्या लेखणीवर त्याची श्रद्धा होती. त्याच्या उमेदी-वर आणि उद्योगशीलतेवर माझी होती. जे ‘रत्नाकर’ मासिक आम्ही पुढें १९२६ साली सुरू केल तें कदाचित् याच वेळीं निघाल असत; परतु तितक्यात दुसरीच एक घटना घडली.

सिंध हैदराबाद येथें बेझटबाईनी पूर्वीच स्थापन केलेल्या थिऑसॉफिकल कॉलेजचं रूपातर होऊन तें मुंबई विश्वविद्यालयाला जोडल गेल, व त्या कॉलेजांत प्रोफेसरची जागा मला देऊं करण्यात आली. अर्थात् मी तिकडे जावयास निघालों; आणि त्यामुळें आप्पासाहेब व मी उभयतांनी अस ठरविल कीं, मासिक काढण्यांचा बेत काही दिवस लांबणीवर टाकावा, आणि तूर्त आप्पासाहेबांनीं वर्गणीदाराना वर्षातून चार पुस्तक देणारी अशी एक ग्रथमाला काढावी. या मालेचं नाव ‘ विजय साहित्य ’ अस ठेवण्यात आल, अन् तिच्यासाठीं पहिली तीन पुस्तक मी लिहून द्यावीं असं ठरल. यांपैकीं ‘ कुलाब्याची दांडी ’ ही कादंबरी मी लिहीतच होतों. मी पुण्या-हून हैद्राबादला गेलों तों या कादंबरीचीं तयार झालेलीं सात आठ प्रकरणं

बॅगमधे बरोबर घेऊन अन् उरलेलीं प्रकरण शक्य तितक्या लवकर लिहून काढण्याचा हेतु मनात धरून.

परंतु माझा हा हेतु पूर्ण झाला नाहीं.

सिंध हैदराबादला गेल्यावर आजूबाजूचा प्रदेश हिंडून पाहण्यांत व सिंधी लोकाच्या चालीरीतींच अवलोकन करण्यात मी इतका गर्क झालों कीं, हातीं घेतलेली नवी कादंबरी लिहिण्याकडे माझं चित्तच कित्येक दिवस वळलं नाहीं. दिल्लीकडल्या मुलखापेक्षां सिंध प्राताची नैसर्गिक छबी फारच निराळी. परतु सौंदर्यलोलुप दृष्टीला समाधान वाटाव अशा पुष्कळ गोष्टी त्या प्रातांत मला आढळल्या. वर्षाकाठीं अवघा तीन चार इंच पाऊस त्या प्राताच्या वाट्याला येत असूनहि त्याची सुपीकता महाराष्ट्रान हेवा करण्या-सारखी मला वाटली. कुविख्यात ' सक्करच धोरण ' त्या वेळीं कुणाच्या कल्पनेंतहि नव्हतं. परतु, सिधु नदाचे कालवे जिकडे तिकडे त्या वेळींहि वाहत होते, व कालव्याच्या पाण्यावर पोसली जाणारीं शेत आणि बागा पाहिल्या कीं, मनाला केवढी तरी प्रसन्नता वाटे. जिकडे तिकडे सुबत्ता आणि परिपुष्टता डोळ्याना दिसे. माणस धिप्पाड, आणि फळफळावळहि मुबलक व तेजःपुज ! तीन हात लांबीचे व दंडाएवढ्या परिघाचे पाढरे स्वच्छ मुळे मी प्रथम पाहिले तेव्हा माझ्या मनात चटकन् विचार आला तो हा कीं पुण्याकडच्या एखाद्या लग्नातलं प्रयोजन इकडच्या चारसहा मुळ्यावर सहज पार पाडता येईल. सफरचद, नासपत, अंगूर, इत्यादि फळ इतकी स्वस्त की, सामान्य माणसानहि फलाहारावर मजेत दिवस काढावेत. गौळवाड्यात जाऊन दिवसातून दोन वेळा बारा सोळा शेर दूध देणाऱ्या गाई पाहिल्या कीं, वाटे, श्रीकृष्णाच बालचरित्र मथुरेत न होता या मुलखात तर झाल नसेल ? गाढवंसुद्धां बेटीं अशीं कातियुक्त व मस्त, कीं त्याच्या जातीच नाव शिवीखातर वापरण्याला सकोच वाटावा. गवळी रतिबाच्या कासड्या घेऊन घरोघर जायचे ते गाढवावर बसूनच. किंबहुना, सर्वसामान्य माणसाच्या दृष्टीन ते जनावर घोड्याइतकच प्रतिष्ठित वाहन तिकडे समजल जात. कॉलेजात येताना विद्यार्थी गाढवावर बसून येत नसत हें खरं, परंतु ' फुलेली ' कालव्याच्या दुतर्फा रम्य वनश्रीच्या ज्या अगणित जागा होत्या तिथें वनभोजनासाठीं आम्ही गेलो कीं ते आपली गर्दभारोहणाची

हौस अगदी मनःपूत भागवून घेत असत. अशा थाटातले विद्यार्थ्यांचे काहीं फोटो अजून माझ्या संग्रहीं आहेत.

निसर्गाच्या प्रसादामुळें माणसहि हाडापेरानं मजबूत आणि उंचनिच बांध्याचीं दिसत. साधे कामकरी-शेतकरी पाहिले तरी अगदीं निरामय वाटत. निळसर रंगाच्या खरखरीत जाडयाभरडया सैल तुमानी व गुडध्यापर्यंत पोंचणारे सदरे अशा वेशाचे, अन् रेखीव पाणीदार नाकाडोळयाचे भिकारी दाराशीं आले तरी कपाळावर व कानांच्या पाळ्यांवर रुळणारीं त्याची केसांची झुलप पाहून मनाला प्रसन्नता येई; आणि काहीं एका विचित्र घाटाच्या सारंगीवर गज फिरवीत ते अस्सल सिंधी वळणाची कव्वाली म्हणूं लागले की, ती कितीहि ऐकली तरी आणखी ऐकावीशी वाटे. मी पुष्कळदा त्याना मुद्दाम आपल्या दाराशीं बोलावून घेई, व त्यांच्या गीताचे शब्द टिपून ठेवी. परंतु त्यातली एखादी कवाली आपल्या बाजाच्या पेटीची साथ घेऊन मी स्वतःशीं म्हणूं लागलों कीं ती मला अगदीं नीरस वाटे. मग माझ्या ध्यानांत येई कीं दारोदार फिरून भीक मागणाऱ्या त्या कव्वालांच्या कंठधर्मात आणि शब्दोच्चारांत शेंकडो वर्षांचा इतिहास आणि परंपरा होती व त्यातच त्या कवालीचं खरं माधुर्य होतं !

अशा प्रकारें तो प्रदेश व तेथील लोक यांचं मनःपूत निरीक्षण करण्यांत मी प्रथम प्रथम दंग झालों होतो. अर्थात् निरीक्षणाच्या आनंदासाठीं मी हें सारं करीत होतों. मला कल्पना नव्हती कीं, माझ्याकडून पुढच्या लेखनाची ही आपोआप तयारी होत होती. 'अटकेपार', 'निरंजन' आणि 'काश्मिरी गुलाब' या माझ्या कादंबऱ्यात सिंध प्रांतातल्या स्थळाचीं जी वर्णनं आहेत त्याचं मूळ हैद्राबादला असताना मीं जो प्रवास केला व अवलोकन केलं त्यात आहे. 'निरंजन' कादंबरींत शेवटीं शेवटीं ( बाविसाव्या व तेविसाव्या प्रकरणात ) हैद्राबाद शहराचं पुष्कळच वर्णन आलेलं आहे, आणि गुरुद्वार देवालयाचं जें चित्र मीं काढलेलं आहे तें तर एखाद्या चित्रकारानं एखाद्या स्थळाची प्रत्यक्ष त्या ठिकाणीं बसून स्केचेस् करून ठेवावींत व नंतर त्यांवरून लॅंडस्केप तयार करावं तशा तऱ्हेच आहे. हैद्राबादला असताना त्या देवालयापासून एका हाकेच्याच अंतरावर मी राहत होतों.

हैद्राबादच्या मुक्कामातले दोन अडीच महिने अशा रीतीनें एक प्रकारचा

खेळ करण्यांत घालविल्यावर त्या नादांत हातावेगळीं ठेवलेली 'कुलाब्याची दाडी' ही कादंबरी मग मात्र मी खचित पुन्हा जोरानं लिहूं लागलो असतों. परंतु तो विचार माझ्या मनांत येऊं लागला न लागला तोंच अकल्पितपणें मलाच हैद्राबाद सोडावं लागल. या हकीगतींचा माझ्या साहित्यसेवेशीं साक्षात् संबंध नसला तरी माझ्या लेखनात सतत प्रतिबिंबित होणारा माझा योगायोगावरील विश्वास त्या चमत्कारिक हकीगतीनं दृढावला हें उघड असल्यामुळें ती संक्षेपानं या ठिकाणी सांगावीशी वाटते.

ता. २१ जून १९२२ रोजीं मीं सिंध हैदराबादच्या 'नॅशनल कॉलेज'-मधील जागेवर रुजू झालों. ही जागा मला देऊं करण्यात आली याचं मुख्य कारण प्रिन्सिपल रुद्र यानीं दिलेंल सर्टिफिकेट. त्यांनीं शिफारसपत्रात लिहिलं होतं, "आपण अगदीं बरोबर निशाण मारलं हें समजल्यावर शिकाऱ्याला जसा आनंद होतो तसाच आनंद मी निवडलेले प्रो. फडके माझ्या कॉलेजांत काम करूं लागल्यावर त्याचं शिकविण पाहून मला झाला. त्याना नाइलाजानं निरोप द्यावा लागतो याबद्दल मला अत्यंत खेद होत आहे." या सर्टिफिकिटामुळें माझी निवड तर झाली होतीच, परंतु माझ्याविषयीं फार अनुकूल अशी वृत्ति कॉलेजच्या अधिकाऱ्याच्या ठिकाणीं निर्माण झाली होती. मी दोन महिने काम केल्यानंतर त्यानीं मला नोकरीवर कायम होण्याविषयीं विचारलं. इतक्या दूरच्या प्रांतात स्थायिक व्हावं लागणार या दृष्टीनें मी त्यांना सांगितलं कीं, माझा पगार ताबडतोब तीनशें करीत असाल व बढतीचं प्रमाण निश्चित करीत असाल तर मी कायम होईन. हें माझ म्हणणं त्यानीं आनंदानं मान्य करावं असंच होतं. तथापि त्यांच्या कार्यकारी मंडळाची सभा होऊन तिचा अधिकृत निर्णय माझ्या हातीं पडेपर्यंत अवधि होता.

मध्यंतरीं भावनगर येथील 'सामळदास' कॉलेजांत तत्त्वज्ञानाच्या अध्यापकाची जागा रिकामी असल्याचं कळल्यावरून मीं त्या जागेसाटीं अर्ज केला होता. ता. १७ ऑगस्ट रोजीं त्या कॉलेजचें प्रिन्सिपल श्रीयुत कणिया यांजकडून मला तार आली कीं, तुमची निवड बहुतेक झाल्यासारखी आहे, परंतु तुमच्या नेमणुकीचा हुकूम देण्यापूर्वी तुम्हाला प्रत्यक्ष भेटण्याची दिवाणसाहेबाची इच्छा आहे. ही तार मिळाल्यामुळें मी ताबडतोब भावनगरला गेलों. माझ्या नेमणुकीबद्दलच्या वाटाघाटी तिथें आधींच इतक्या

शिजलेल्या होत्या कीं फक्त एक जरूरीचा विधि म्हणून मी दिवाणसाहेबांची भेट घ्यायची आणि मग लगोलग माझ्या नेमणुकीच्या हुकुमावर त्यांची सही व्हायची, येवढ्याच काय त्या गोष्टी उरल्या होत्या. परंतु मी ज्या दिवशीं हैदराबादहून निघालों त्याच दिवशीं दिवाण सर प्रभाशंकर पट्टणी यांना कांही एका जरूरीच्या कामासाठीं भावनगरहून जावं लागलं. त्यामुळें माझं काम मी गेलों त्याच दिवशीं न होतां सर पट्टणी परत येईपर्यंत वाट पाहणं मला भाग पडलं. सिंधमध्ये ऑगस्ट महिन्यात गोकुळअष्टमीच्या उत्सवानिमित्त शाळा-कॉलेजांना मोठी सुटी असते. ही सुटी चालू असल्या-मुळें मला रजेची अडचण नव्हती. शिवाय, स्टेटचा पाहुणा म्हणून माझी सरबराई इतकी सुंदर ठेवण्यांत आली होती कीं, दोन चार दिवस अधिक राहावं लागलं तर ती इष्टापत्तीच वाटावी. आणि याहिपेक्षा माझ्या मनाला आनंद देणारी गोष्ट होती ती ही कीं, जणू माझी नेमणूक झालीच आहे व मी त्यांच्यांतलाच एक आहे अशा भावनेनं तेथील अध्यापक माझ्याशीं वागत होते. मी नोकरीवर रीतसर रुजू झालों म्हणजे मला राहण्यासाठीं चांगली जागा पाहिजे या हिशोबानं त्यांनीं पांचदहा बंगले सुद्धा मला दाखविले. सारांश मी सामळदास कॉलेजांत काम करूं लागणार याबद्दल सर्वांची अगदीं खात्री होती. मला पट्टणींची वाट पाहात काढावे लागलेले दोन तीन दिवस मला सुखाचेच झाले.

परंतु, सर पट्टणी परत आले व निराळीच घटना झाली, ज्या जुन्या प्रोफेसराच्या जागीं माझी नेमणूक व्हायची होती त्यानीं त्यांच्याकडे जाऊन त्यांचे पाय धरले व विनंति केली कीं, माझ्या संसाराच्या अन् मुलाबाळां-च्या अशा अशा गोष्टी आहेत, तेव्हा मला निवृत्त करूं नका. पट्टणींच्या भेटीसाठीं मीं गेलो तेव्हा ते मला म्हणाले, 'त्या प्रोफेसराचं अस असं हातापाया पडून सांगणं आहे. तेव्हां काय करावं ?' मीं म्हटलं, 'मी काय सांगणार ? आपल्याला उचित दिसेल तें करा.'

दुसऱ्या दिवशीं सर पट्टणीनीं निकाल केला कीं, फडके यांची नेमणूक एक वर्षभर लांबणीवर टाकावी.

प्रिन्सिपल कणिया पुष्कळ भांडले कीं, ते जुने प्रोफेसर आतां सेवानिवृत्त

होण्याच्या लायकीचे झाले आहेत, व कॉलेजच्या हिताच्या अन् विद्यार्थ्यांच्या संतोषाच्या दृष्टीनं फडक्याची नेमणूक ताबडतोब करणं इष्ट आहे.

परंतु त्या वृद्ध प्रोफेसरमजकुराविषयीं दयेची जी भावना पट्टणींनीं करून घेतली होती तिच्यापुढें प्रिन्सिपल कणियाचं कांहीं चाललं नाहीं. जाता-येतांच्या फर्स्ट क्लास रेल्वे भाडयाचा अहेर मला संस्थानच्या तिजोरीकडून मिळाला आणि मी भावनगरहून परत निघालों. मला निरोप देण्यासाठीं आलेली प्रोफेसर मंडळी पुनः म्हणत होतीं, 'आज तुम्ही जाता, पण पुढच्या वर्षी तर खचित याल.'

मी वरकरणीं हास्य करून म्हणत होतों, 'अर्थात्.' परंतु मनात मात्र वाटत होतं, 'काय योगायोग असेल तो खरा.'

भावनगरची नोकरी मोठ्या पगाराची होती व ती मला त्याच वेळीं मिळाली असती तर मला आनंद झाला असतां हें खरं. तथापि ती मला मिळाली नाहीं याचं मला विशेष वाईटहि वाटलं नाहीं. कारण हैद्राबादच्या कॉलेजची मंडळीं मला कायम करतील ही माझी खात्री होती. त्यामुळें भावनगर स्टेशनवरून गाडी सुटल्यावर माग मान टेकून खिडकींतून दिसणारी बाहेरची वर्षाकालीन सृष्टिशोभा पाहत मीं बसलों, तेव्हा मी म्हटलं, एका आजपर्यंत न पाहिलेल्या मुलखांत मजेत मुशाफरी करावयास मिळाली, काय बिघडल ?...

परंतु हैद्राबादला एका निराळयाच अकल्पित घटनेचं ताट मधल्या अवकाशात माझ्यासाठीं तयार झालं होतं.

आणि ते कुणाच्या कृपेमुळें ? तर...

ती एक सहजासहजीं खरी न वाटणारी गोष्ट आहे.

## १२

१८ ऑगस्ट १९२२ रोजीं मी भावनगरला जावयास निघालों, तो २६ ऑगस्ट रोजीं हैदराबादला परत आलों, आणि पाहतों तों ' अत्यंत जरूरीचें ' असं ज्यावर लिहिलं होतं असा एक लिफाफा माझ्या टेबलावर आदल्या दिवशींच येऊन पडला होता.

मी तो उघडला. आंतील पत्रावर हैदराबादच्या कॉलेजचे प्रिन्सिपल अडवानी यांची सही होती, आणि ' मला ताबडतोब येऊन भेटा; फार महत्त्वाचं काम आहे ' इतकाच मजकूर त्यांत लिहिलेला होता.

मी प्रिन्सिपलकडे जात असतां वाटेंत शेख नावाचा एक विद्यार्थि भेटला.त्यानं मला मुद्दाम थांबवून म्हटलं, " Congratulations, sir."

मीं म्हटलं, " कशाबद्दल रे ? "

तो म्हणाला, " तुम्ही इथून गेलांत त्याच्या दुसऱ्याच दिवशीं कॉलेजच्या गव्हर्निंग कॉलेजची सभा झाली अन् तुम्ही मागितलेल्या पगारावर तुमची कायमची नेमणूक करण्याचा ठराव पास झाला. "

" खरं म्हणतोस ? "

" अगदीं पक्की बातमी आहे माझी. मिठाई दिली पाहिजे तुम्ही आम्हांला. "

" मिठाईच कां, मेजवानी देईन. "

" नाहीं, चेष्टा केली सर. मीच तुम्हांला देणार आहे. केव्हांचा ठरवूं या बेत ? उद्यां रात्रीं ? "

" बोलूं त्याबद्दल सावकाश. आतां मी घाईत आहें. ताबडतोब येऊन भेटा म्हणून प्रिन्सिपल अडवानींचं पत्र येऊन पडलं होतं माझ्या टेबलावर. "

" होय ? मी सांगितली तीच बातमी तुम्हाला द्यायसाठीं त्यांनीं तुम्हाला बोलाविलं असणार. "

" Let us hope so " असं हंसत म्हणून मी आपल्या सायकलवर चढलों अन् पुढें झालों. शेखनं केलेला तर्क मला खरा वाटेना. मला कायम केल्याचा गव्हर्निंग कौन्सिलचा ठराव कळविण्यासाठीं अडवानींनं मला घरी बोलविण्याची काय गरज होती ? तो हुकूमच माझ्याकडे त्यांनीं सरळ धाडला असता. आणि शिवाय, तो कळविण्यासाठीं माझी गाठ घेण्याची त्यांची इच्छा असती तरी पत्रात तशी थोडीशी सूचना त्यानीं दिली नसती काय ?...अडवानीकडे मला काही तरी वाईट बातमी समजणार आहे हा माझ्या मनांतला संशय जाईना.

" गुड मॉर्निंग, फडके " असं म्हणून माझं स्वागत करतांना अडवानींच्या चेहऱ्यावर जे हास्य मला दिसल तें पाहताच मी ओळखलं कीं तें कृत्रिम आहे. आणि मग त्यांच्या ठरीव लकबीप्रमाणें प्रत्येक वाक्याच्या आरंभीं डोळे मिटायचे आणि अखेर उघडायचे अस करीत जेव्हा जड आवाजानं बोलण्यास त्यानीं प्रारंभ केला तेव्हांच मी ओळखल कीं माझा संशय खरा होता.

मी हैदराबादहून आठच दिवस दूर होतों पण तेवढ्या अवधींत माझ्या भवितव्यावर परिणाम करणाऱ्या किती तरी गोष्टी एखाद्या नाटकांत शोभतील अशा वेगानं घडल्या होत्या.

ता. १९ ऑगस्ट रोजीं कॉलेजच्या गव्हर्निंग कौन्सिलची सभा होऊन माझी कायमची नेमणूक झाली होती.

आणि आता ता. २७ रोजीं त्याच गव्हर्निंग कौन्सिलची एक विनंति प्रि. अडवानी मला सादर करीत होते ती अशी कीं, मी आपण होऊन कॉलेजच्या नोकरीचा राजीनामा द्यावा.

ती सांगताना अडवानी पुनः पुन्हा म्हणत होते, " फडके, आम्हांला तुम्ही अतिशय हवे आहात. परंतु, आम्हाला कसं पेचांत धरलं आहे त्याचा विचार करा. "

त्याना खरोखर बिकट पेंचात धरलेलं होतं.

कुणी ?—तर त्यावेळीं मुंबई सरकारच्या शिक्षणमन्त्र्याच्या हुद्यावर असलेले आताचे 'डॉक्टर' व त्यावेळचे नुसते रॅंग्लर र. पु. परांजपे यानीं !

तो पेच जितका खुनशी व दुष्टपणाचा तितकाच हैदराबादच्या नॅशनल कॉलेजच्या दृष्टीनं बिनतोड असा होता.

तें कॉलेज पूर्वी बेझटबाईनीं चालविलेलं स्वतंत्र कॉलेज होतं. त्याचं रूपातर होऊन ते आता मुंबई युनिव्हर्सिटीला जोडल गेलं होतं. युनिव्हर्सिटीची मान्यता मिळून कॉलेजचं काम जरी जून महिन्यापासून प्रत्यक्ष सुरूदेखील झालं होत तरी अजून दोन गोष्टी व्हायच्या होत्या. लायब्ररी, लॅबोरेटरी, इमारती, इत्यादि बाबतींत कॉलेजची व्यवस्था कशी काय आहे तें पाहण्यासाठीं युनिव्हर्सिटीनं नेमलेलं कमिशन येऊन गेलं होतं त्याचा रिपोर्ट व्हायचा होता; आणि कोणत्याहि नवीन कॉलेजला अखेरची जी मान्यता सरकारनं द्यायची असते तीहि या कॉलेजला मिळावयाची होती.

या दोन्ही गोष्टी आपल्याला अनुकूल अशा सहज होतील अशा समजुतींत कॉलेजचे लोक साहजिकच होते. कारण कॉलेजच्या सरंजामात आणि व्यवस्थेंत न्यून काढायला त्यांनीं जागाच ठेवली नव्हती.

परंतु, अशा निर्धास्त खुषींत ती मंडळी असतांना ता. २० ऑगस्ट रोजीं प्रि. अडवानीला त्या वेळचे युनिव्हर्सिटीचे व्हाइस-चॅन्सेलर चिमणलाल सेटलवाड याची तार आली कीं, ' मला ताबडतोब येऊन भेटा. '

अडवानी मुंबईस जाऊन सेटलवाडना भेटले तेव्हां त्यांना सांगण्यांत आलं कीं, ' प्रो. फडके याना तुमच्या स्टाफवरून कमी कराल तरच तुमच्या कॉलेजला सरकारी मान्यता मिळेल.'

अडवानी म्हणाले, " फडके तर उत्कृष्ट शिक्षक आहेत ! ते आपल्या कामाला लायक नाहींत असं तर तुमचं म्हणण नाहीं ? "

" नाहीं. "

" मग त्यांना कामावरून काढण्याबद्दल आग्रह कशासाठीं ? "

" हा आग्रह माझा नाहीं. शिक्षणमत्री पराजपे यांचा आहे. त्यांना तुम्ही भेटा. "

" ठीक आहे " म्हणून अडवानी परांजप्याच्याकडे गेले. ते अडवानीशीं चर्चा करायला तयारच नव्हते. त्याचं हट्टाचं एकच बोलणं, " तुम्ही फडक्याना काढा, नाहीं तर तुमच्या कॉलेजला सरकारी मान्यता मिळणार नाहीं. "

परांजप्याच्या त्या उद्गारावरून त्या एकंदर प्रकाराचं खरं स्वरूप अडवानींच्या लक्षात सहज आलं. फडक्यांवर वैयक्तिक सूड उगविण्याची आपली तहान पराजप्याना भागवायची होती, व मत्रिपदावर ते अधिष्ठित असल्यामुळें अधिकाराच्या जोरावर नॅशनल कॉलेजला पेचात धरून आपली तहान भागवून घेण्याचं त्यानीं ठरविलं होतं. फडक्यांना काढा असा सरळ कागदोपत्रीं हुकूम देण्याची त्यांची छाती नव्हती, आणि म्हणून खासगी दटावणीचा हा भेकड मार्ग परांजप्यानीं शोधून काढला होता. अडवानींच्या मनात एकदां असहि; आलं कीं, पराजप्याना सरळ सागाव, तुम्हांला फडक्याच्याविरुद्ध काय म्हणायचं असेल तें उघड म्हणून आम्हाला रीतसर हुकूम सोडा, मग त्याचा आम्ही विचार करूं. परंतु या विचारात काहीं अर्थ नव्हता. कारण पराजपे कागदोपत्रीं उघड उघड फडक्याविरुद्ध ब्र काढूं शकत नव्हते हें जितक खरं, तितकंच हेंहि स्पष्ट होतं कीं त्या घटकेला नॅशनल कॉलेजचा हात अन्य रीतीन अडकलेला होता. त्याची लॅबोरेटरी, लायब्ररी इत्यादि व्यवस्था पाहून गेलेल्या युनिव्हर्सिटी कमिशनचा रिपोर्ट अद्याप प्रसिद्ध व्हायचा होता. तो रिपोर्ट प्रतिकूल होईल अशी व्यवस्था पराजपे सहज करूं शकत होते. आणि अशा रिपोर्टांचा आधार घेऊन कॉलेजला मान्यता नाकारण्याचं काळं कृत्य पराजप्याना अगदी उजळ माथ्यानं करता येण्यासारख होत. ही धमकी अडवानींना पर्यायानं सांगण्यातहि आली. अर्थात् सत्तेपुढें शहाणपण न उरल्यामुळें

त्रस्त समंधा शात हो ' असा मंत्र म्हणून अडवानी मुंबईहून परत आले होते. ते परत आल्याबरोबर कॉलेजच्या गव्हर्निंग कौन्सिलची सभा झाली होती व मी आपण होऊन राजीनामा द्यावा अशी मला विनंति करण्याचा ठराव पास झाला होता.

ही सारी हकीगत सागताना अडवानींच्या मनातला संताप व दुःख मला स्पष्ट दिसत होतं. त्यांनीं आपलं बोलणं संपवून शेवटच्या वाक्याच्या वेळीं मिटलेले डोळे उघडून माझ्याकडे पाहिलं तेव्हा मी त्यांना म्हटलं,

" तुम्ही ही गोष्ट मनाला लावून घेण्याचं बिलकूल कारण नाहीं. तुमचा कसा नाइलाज आहे हें उघड दिसत असतांना मी तुम्हाला दोष देईन हें संभवतं काय ? माझ्यामुळें तुमच्या कॉलेजवर संकट यायला नको. मी आनदान जातो. "

कॉलेजातील विद्यार्थी व कित्येक नागरिक हा प्रकार कळतांच इतके खवळले कीं ते माझ्याकडे येऊन म्हणू लागले, आम्ही जाहीर सभा भरवितो आणि पराजप्याचा निषेध करतो. परतु पराजप्याची कारवाई कितीही दुष्ट आणि निंद्य असली तरी असल्या चळवळीन कॉलेजचं अनहित होईल हें मला स्पष्ट दिसत होतं. मी त्याच्या म्हणण्याला संमति दिली नाहीं, व हैदराबाद सोडलं.

निरोपाच्या सभा झाल्या, सत्कारसमारंभ झाले. २१ जून रोजीं माझ्या आयुष्यातलं एक नवीन प्रकरण सुरू करण्यासाठीं मी या परमुलखांतल्या शहरीं जितक्या अकल्पितपणानं आलों होतों, तितक्याच अकल्पितपणानं ता. ५ ऑक्टोबर रोजीं परत पुण्यास जाण्यासाठीं मी निघालो !...

कोजागिरी पौर्णिमेची ती रात्र होती. आगगाडीच्या खिडकींतून बाहेर पाहिलं कीं चंद्राचं प्रसन्न पूर्णबिम्ब स्वच्छ नीलाकाशातून दिमाखानं तरंगत वर चढतांना दिसत होतं, आणि चंद्रिकेच्या शांत प्रकाशात चमचमणारा वालुकामय प्रदेश विलक्षण शोभिवंत दिसत होता.

हैदराबादला असतांना त्या सारंगीवाल्या भिकाऱ्याकडून शिकून घेतलेल्या गीतापैकीं एक गुणगुणत मी मनाशीं विचार करूं लागलों, ही सृष्टि अन् विचित्र अकल्पित सुखदुःखप्रसंगानीं भरलेलं हें मानवी जीवित— यांना काहीं अर्थ आहे काय ?

आज जवळ जवळ वीस वर्षानंतर माझ्या एकंदर आयुष्याच्या व्यापक दृष्टीनं हैदराबादला मी एकाएकीं गेलो व तेथून अकस्मात् परत आलो, हा प्रकार माझ्या अहिताचा झाला असं मला वाटत नाही. तिथल्या वास्तव्याचे माझे चार महिने वाया गेले असहि मला वाटण्याचं कारण नाहीं. कारण आपत्तीच्या त्या अनुभवानं मला व्यवहारिक जगाचं अन् मनुष्यस्वभावाचं जे ज्ञान झालं तें माझ्या लेखनाच्या उद्योगाला उपकारकच ठरलं असलं पाहिजे. आणि सिंध प्रांतातल्या माझ्या वास्तव्याच्या कालाचा मी सौंदर्यशोधक दृष्टीनं उपयोग केला त्याचीं फळ तर माझ्या कादंबरी-लेखनात आज माझ्या वाचकांना पाहायला मिळण्यासारखीं आहेत.

परतु सिंहावलोकनाची ही दृष्टि त्या वेळीं मला कशी वापरता येईल ? मी परत पुण्याला आलो तो काहीसा चिडलेल्या मनःस्थितींतच. मी असहकारितेच्या चळवळीतून अंग काढून घेतलं त्याबद्दलचा माझ्यावरचा लोकाचा राग अजून ओसरला नव्हता. लोकांना अद्यापि मी अप्रियच होतो. राजकारणातून मी निवृत्त झालो त्याची शिक्षा मला मिळाली पाहिजे असा विचार करणाऱ्या लोकाना मला दिल्लीची व पाठोपाठ हैदराबादची जागा मिळाली हें पाहून वाईट वाटलं होतं. या लोकाना मला परत पुण्यांत याव लागल म्हणून फार आनंद झाला. आणि त्यांना फार आनद होण्यासारखी गोष्ट घडली म्हणूनच मला फार विषाद वाटला.

अर्थात् हा विषाद मी दीर्घकाल टिकूं दिला नाहीं. माझं आवडतं साहित्यविषयक कार्य तर कुणी माझ्यापासून हिरावून घेऊं शकत नव्हत ना ? त्यांतच मग्न होण्याच मी ठरविलं. माझ्या नव्या कादंबरीच लिहून झालेलं हस्तलिखित मी बाहेर काढलं. उरलेमीं प्रकरण आतां त्वरेनं लिहून काढण्याचा मी निश्चय केला. 'विजय-साहित्या'तलं पहिल पुस्तक म्हणून ही कादंबरी प्रसिद्ध करण्यासाठीं आप्पासाहेब गोखले वाटच पाहात बसले होते.

परतु ' कुलाब्याची दांडी ' १९२२ साली प्रसिद्ध होण्याचा योग नव्हता असं म्हटलं पाहिजे. कारण याच सुमारास आयर्लंडच्या इतिहासात एक विलक्षण रोमांचकारी प्रसंग घडला, व त्यानं सबंध हिंदुस्थानात जागृत केलेल्या जिज्ञासेचा फायदा घेऊन दुसरंच एक पुस्तक मी ताबडतोब लिहावं असं माझ्या व गोखल्याच्या मतानं ठरलं.

सुप्रसिद्ध आयरिश पुढारी टेरेन्स मॅक्स्विनी यानं तुरुंगात अन्नसत्याग्रह करून जवळजवळ ऐशीं दिवसांच्या उपोषणानंतर प्राण सोडला. त्याच्या या अपूर्व दिव्यान साऱ्या जगाचं लक्ष त्याच्याकडे व ज्या आयर्लंडच्या स्वातंत्र्ययुद्धात त्यानं अशा प्रकारें देह ठेवला त्या आयर्लंड देशाकडे जोरानं वळल. हिंदुस्थानांतील लोक आयरिश लोकाकडे नेहमींच समदुःखी या नात्यानं पाहत आले होते. त्यामुळें मॅक्स्विनी मृत्युवश झाला तेव्हां जणूं आपल्याच एका पुढाऱ्याचं देहावसान झाल इतकं दुःख व ब्रिटिश राज्य-कर्त्यांबद्दलचा संताप या देशांत पसरला.

मॅक्स्विनीचं मराठी चरित्र लिहिण्याची ती अत्यंत योग्य संधि होती. मी तें झपाट्यानं लिहिण्यास प्रारंभ केला. त्या पुस्तकाचं नांव मी ठरविलं, 'हिंमत बहादर टेरेन्स मॅक्स्विनी.'

आयर्लंड देशांतलं गेल्या पंचवीस वर्षांचं राजकारण व मॅक्स्विनीचे उद्योग याबद्दल शक्य तितकी माहिती गोळा करून, व विवेचक बुद्धीनं अजमावून पुस्तक लिहिण्याची माझी केवढीहि इच्छा असली तरी तिचे विशेष चोजले करणं मला शक्य नव्हतं. मराठी वाचकाच्या भावनाचा ठाव घेईल असं चरित्र लिहिण्याचा माझा मुख्य हेतु होता आणि तें शक्य तितक्या ताबडतोब प्रसिद्ध करून लोकाची भूक भागविण्याचा आप्पासाहेब गोखल्यांचा बेत होता.

म्हणून विस्तृत वाचन करण्याच्या भानगडींत फारसं न पडता मी पुस्तकाची आंखणीं केली. पी. एस. ओहेगार्टी यांचं "A short life of Terence MacSwiney" हें पुस्तक, व स्वतः मॅक्स्विनीनं लिहिलेलं "Principles of Freedom" हें पुस्तक या दोहोंवर विशेष भर देऊन मी चरित्र लिहायला आरंभ केला. एकंदर सोळा प्रकरणाचं हें पुस्तक मी दहा दिवसांत लिहून काढल.

आणि मग तें अल्पावकाशांत विजय साहित्यातलं पुस्तक म्हणून प्रसिद्ध झाल.

१९२१ सालची माझी डायरी चाळून पाहत असतां सोमवार ता. २५ डिसेंबर या पानावर 'रत्नाकर मासिका'चें पत्रक लिहून तयार केलें अशी नोंद मला आढळली. यावरून असं दिसतं कीं जे नवं मराठी

मासिक काढण्याची कल्पना मी दिल्लीस जाण्याच्या आधींपासून माझ्या व आप्पासाहेबांच्या मनात अंकुरित झाली होती ती आता अधिक दृढ झाली असली पाहिजे. ' विजय साहित्या 'च्या पहिल्या पुस्तकांत घालून रवाना करण्यासाठी उपरोक्त पत्रक मी तयार केलं असावं. मात्र, मासिकाची ही कल्पना लगेच अमलात आली नाहीं. या गोष्टीचं मुख्य कारण असं कीं, मासिक काढायचं झाल्यास त्याच्या संपादनाची सर्व जबाबदारी पार पाडण्यासाठीं मी यापुढें पुण्यासच राहीन असा भरंवसा गोखल्यांना हवा होता, आणि पुण्यातच स्थिर होण्याची माझी तर मनातून तयारी नव्हती. कां कोण जाणे, पण मला वाटे एखाद्या कॉलेजात प्रोफेसर म्हणून शिकविणं हेंच मला सर्वांत अधिक समाधान देणारं काम, आणि यातच माझी खरी प्रतिष्ठा !

मॅक्स्विनीचं चरित्र हातावेगळं केल्यानंतर वास्तविक कादंबरीची पूर्णता मी लवकर करायची; परंतु त्या पुस्तकानं मराठी वाचकाच्या ठिकाणीं एक नवीनच भूक उत्पन्न केली. मॅक्स्विनीच्या निमित्तानं आयर्लंडकडे वळलेल्या लोकाच्या नजरेपुढें दुसरा एक आयरिश देशभक्त त्याहूनहि अधिक प्रामुख्यानं त्या वेळीं वावरत होता. त्याचं चरित्र मी लिहावं अशा अनेक लोकानीं सूचना केल्या. कै. शिवरामपंत परांजपे ( ' काळ 'कर्ते ) यांना माझं मॅक्स्विनीचं चरित्र इतकं आवडलं कीं, त्यानींहि गोखल्यांना हीच सूचना फार आग्रहानं केली.

या कारणानं ' कुलाब्याची दांडी ' पुन्हां मागे पडली. माझं पांचवं पुस्तक म्हणून ज्या पुस्तकाचं लेखन १९२३ सालच्या जानेवारी महिन्याच्या २१ तारखेस मी सुरू केलं तेंहि चरित्रच होतं.

त्या पुस्तकाचं नांव ' आयरिश धुरंधर इमॉन डी व्हॅलेरा. '

# १३

डी व्हॅलेराचं चरित्र लिहिण्यांत मी मुख्यतः दोन पुस्तकाचा उपयोग करून घेतला. एक डब्लिन येथील ‘ टालबट ’ प्रेसन प्रसिद्ध केलेल David T. Dwane यांनीं लिहिलेल “ Life of Emon De Valera, ” आणि दुसरं आयर्लंडच्या लढ्यात ज्यान डी व्हॅलेराच्या बरोबरीनं भाग घेतला त्या Don Griffith च ‘ The Real Enemy ’. परंतु, या दोन्ही पुस्तकांत मिळून जी माहिती मला उपलब्ध झाली ती इंग्लडशीं आयर्लंडनं समेट केला व असलं मिळमिळीत स्वातंत्र्य आयर्लंडनं पत्करतां कामा नये असा हट्ट धरून व प्रेसिडेन्टच्या जागेचा राजीनामा देऊन डी व्हॅलेरा आयरिश पार्लमेंटमधून बाहेर पडला, त्या वेळपर्यंतची होती. मी चरित्र लिहायला घेतल तें १९२३ च्या जानुआरी महिन्यात. मधल्या वर्ष दीड वर्षाच्या अवधींत डी व्हॅलेरा कित्येक दिवस स्वकीयाच्या बंदिवासांत होता, अन् मुक्त झाल्यावर त्यानं तहाअन्वयें अस्तित्वात आलेल्या आयरिश सरकारशीं निकराची लढाई केली होती. त्याच्या चरित्रांतलं हें प्रकरण विपादकारक असल तरी वेधकतेच्या दृष्टीन महत्त्वाच व आयर्लंडमधील चळवळीच्या

अभ्यासाच्या दृष्टीनं बोधकारक ठरण्यासारखं होतं खास. ही हकीगत आपल्या पुस्तकात न आली तर ते एक मोठं वैगुण्य उरेल असं मला वाटलं, व गेल्या दीड वर्षात वेळोवेळीं आयर्लंडबद्दलच्या ज्या बातम्या वृत्तपत्रात आल्या त्यांचा नीट अभ्यास करून हा भाग लिहायचं मी ठरविलं. यासाठीं मला फार परिश्रम करावे लागले, परंतु त्या वेळीं मद्रासला 'स्वराज्य' नावाचं जे उत्कृष्ट इंग्रजी वर्तमानपत्र निघत असे, त्याच्या फायलींनीं माझं काम पुष्कळच सोपं केलं. व्हॅलेराचं चरित्र लिहायला मी ता. २१ जानुआरी १९२३ रोजीं प्रारंभ केला, आणि ता. ४ फेब्रुआरी रोजीं—म्हणजे पधरा दिवसांच्या आत मी तें लिहून पुरं केलं.

माझ्या याही पुस्तकाची अगदीं निरपवाद रीतीनं सर्वत्र प्रशंसा झाली.

गोखल्यांच्या 'विजय साहित्या' साठीं जीं पहिली तीन पुस्तकं मी लिहून देणार होतो त्यात आमच्या पहिल्या बेताप्रमाणें 'कुलाब्याची दाडी' ही कादंबरी प्रथम प्रसिद्ध व्हायची होती. परंतु प्रत्यक्ष गोष्टी घडल्या त्या अशा कीं, मॅक्स्विनी व डी व्हॅलेरा याच्या चरित्राचीं दोन पुस्तकं अकस्मात् मागून येऊन पुढें गेली तरी ही कादंबरी ११ व्या प्रकरणावर रेंगाळत राहिली ती राहिलीच होती. त्या कादंबरीचं शेवटचं एकच प्रकरण लिहायचं आतां उरलं होतं, परंतु तें मी केव्हां लिहिलं?—१९२५ सालच्या माझ्या डायरीत २७ जानुआरीला मी नोंद केलेली सांपडते, "कुलाब्याच्या दाडी' चं शेवटचं १२ वं प्रकरण लिहिलं!"

या चमत्कारिक विलंबाचीं दोन कारणं होतीं. एक हें कीं, पुस्तकप्रकाशनाचा धंदा गोखल्यांनी नव्यानच सुरू केल्यामुळें पहिल्या दोन प्रकाशनात घातलेले पैसे वसूल होईपर्यंत तिसरं पुस्तक काढण लाबणीवर टाकणं त्यांना भाग होतं, आणि दुसरं कारण असं कीं, त्याना घाई नव्हती हें जाणून मी आळस करीत होतों. मी पाहून ठेवलं आहे कीं, अगदीं कमालीच्या शीघ्र वेगानं लिहिण्याची शक्ति जरी माझ्या ठिकाणीं आहे, तरी मागं तगादा असल्याखेरीज माझ्या हातून लेखन होत नाहीं. सवड सांपडली कीं लगेच काही तरी लिहून ठेवाव ही माझी वृत्ति नाहीं. एखादं पुस्तक अगर कादंबरी तर राहोच, परंतु एखादा लहानसा लेख किंवा गोष्ट-

देखील माझ्याजवळ लिहून शिल्लक आहे असं आजपर्यंत कधीं झालेलं नाही. लेखनाच्या बाबतींतल्या या विचित्र वृत्तीमुळें माझा तोटा झालेला नाही हें खरं; परंतु आपल्या दोन कादंबऱ्या अन् सातआठ गोष्टी लिहून तयार आहेत असं सांगणारा एखादा उदयोन्मुख लेखक मला अधूनमधून भेटतो तेव्हां मला त्याचं नवल वाटतं. बाकी आपल्या पुस्तकाच्या मलपृष्ठावर ' आगामी पुस्तकें ' या सदराखाली अर्धा–पाऊण पुस्तकाचीं नावं छापून आपल्या बहुप्रसवतेची वाचकांना ग्वाही देणारे प्रथितयश का काय म्हणतात तसले साहित्यिक आपल्याला आढळतातच कीं !

डी व्हॅलेराच्या चरित्राचं पुस्तक मी आता हातावेगळं केलं होतं; ' कुलाब्याची दाडी ' पूर्ण करण्याची घाई नव्हती. ' रत्नाकर ' मासिक काढण्याचे बेत तूर्त लांबणीवर टाकणं भाग होतं. अशा स्थितींत पुण्यात राहणं मला विशेष सुखाचं वाटेना. न्यू पूना कॉलेज सोडल्यानतर मी ' केसरी–मराठा ' संस्थेंत व दिल्लीच्या. अन् हैदराबादच्या कॉलेजात अशा तीन ठिकाणीं नोकरी केली होती; व त्या व्यतिरिक्त लेखनावरहि थोडाफार पैसा मिळविला होता. तथापि, मी असहकारितेच्या चळवळीत पडलो ही मोठी चूक केली अशा समजुतीनं माझे वडील मजवर बरेचसे रुष्ट होते. माझ्या आयुष्याला आलेली अस्थिरता मी स्वतःच्या अविचारानं ओढवून घेतली असें त्यांना वाटे हें मला माहीत होतं. माझ्यावरचा त्याचा रोष प्रेमांतून आणि सहानुभूतींतूनच उद्‌भवलेला आहे हें मला समजत नव्हतं असं नव्हे. तथापि त्या रोषाची सूक्ष्म जाणीव माझ्या मनातून काहीं केल्या जात नसे, व त्यामुळें नोकरीवाचून पुण्यास घरीं राहण्यात मला समाधान वाटत नसे. पुण्याबाहेर कुठें तरी मनाजोगता उद्योग मिळविण्याच्या खटपटींत मी होतों.

न्यू पूना कॉलेजसाठीं देणग्या मिळविण्याचं काम करीत असताना ज्या कित्येक श्रीमान् लोकाचा माझ्याशीं संबंध आला व माझ्यावर कमीअधिक लोभ जडला त्यात सुप्रसिद्ध ठाकरशी घराण्यांतील मुंबईचे एक प्रमुख धनाढ्य व्यापारी हंसराज प्रागजी ठाकरसी हे एक होते. त्यानीं मला लिहिलं, ' तिकडे पुण्यात राहून काय करतां ? ताबडतोब माझ्याकडे निघून

या. मी तुम्हांला उत्तम नोकरी देतों.' मी मुंबईस जाऊन त्यांना भेटलों तेव्हां ते मला म्हणाले,

" हें पाहा, फडके, तुम्ही स्वार्थत्यागपूर्वक कॉलेजात शिकविण्याचा प्रयोग करून पाहिलांत, गांधींच्या चळवळींत भाग घेऊन पाहिलात, आतां माझं ऐकाल का जरा ? "

मी हसून विचारलं, " काय करूं ? "

त्याना पान खायची संवय असे. आपले लाल झालेले दांत दिसतील येवढं हास्य करून ते म्हणाले,

" पैसे मिळवा. तुम्ही मनात आणाल तर पैशाचा ढीग उभा कराल. बिझिनेसमध्यें शिरा. त्या क्षेत्रांत तुमच्यासारख्या लोकाची फार गरज आहे."

मी चाचरत म्हटलं, " पण माझी मनोवृत्ति—"

त्यानीं माझा हात दाबला व म्हटलं, " पुरे, पुरे. आता तुम्ही माझं ऐका. "

त्यांनीं दुसरे दिवशीं मला आपल्या मोटारींत घातलं आणि सेंट्रल बॅंकेचे पारशी मॅनेजर, पोचखानवाला, याच्याकडे ते मला घेऊन गेले. त्याना ते म्हणाले, " हे फडके. याच्याबद्दल टेलिफोनवरून सारी माहिती मी तुम्हाला सागितलीच आहे. "

मी मनाशीं आश्चर्य करूं लागलो, यांनीं सागितलं आहे तरी काय कोणास ठाऊक !

माझं आश्चर्य संपण्याच्या आधींच पोचखानवाला माझ्याकडे पाहून हसले व हंसराज प्रागजींना म्हणाले, " ठीक आहे. याना ॲप्रेटिस म्हणून महिना ७५ रुपये पगारावर आजपासून मी नेमलं आहे. "

त्यानीं घंटा दाबून पट्टेवाल्याला बोलावलं, मला कुणाकडे न्यायचं तें त्याला सागितलं, व ' लागा कामाला ' असं माझ्याकडे हसत पाहून म्हणून हंसराज प्रागजी निघून गेले.

पण बॅंकेंतलं काम मी उणापुरा एक आठवडाभर सुद्धां केलं नसेल. माझ्या वृत्तीला तिथलं काम बिलकूल पटण्यासारखं नव्हतं. पाचसहा दिवसातच मी शरणचिठ्ठी लिहून दिली !

हंसराज प्रागजी माझ्यावर फार रागावले. ते म्हणाले,

“ तुम्ही आपला कसा घात करून घेत आहात त्याची तुम्हाला कल्पना नाहीं. तुम्ही ७५ रुपयावर लागला होता खरे, परंतु चारपाच वर्षांत तुम्हाला तीन साडेतीनशें रुपये पगार झाला असता, अन् पुढें तुम्ही किती मोठ्या हुद्यापर्यंत पोंचला असता काय सांगू ?...”

त्याचं म्हणणं खरं होतं.

मला ज्या दिवशीं पोचखानवाला यांनीं ॲप्रेंटिस म्हणून घेतलं त्याच दिवशीं दुसऱ्या एका पदवीधर तरुणाची अशीच नेमणूक झाली होती. तो बॅंकेच्या नोकरीला चिकटून राहिला, आणि आज त्याला माझ्या चौपट पगार मिळत आहे !

मात्र, या गोष्टीचं वैषम्य मला मुळींच वाटत नाहीं; किंवा बॅंकेची ती नोकरी व्यर्थ सोडली असा पश्चातापहि मला चुकूनसुद्धा कधीं झालेला नाही. माझ्या मनोधारणेशीं विसंगत असं काम करीत राहून मला कितीहि पैसा मिळाला असता तरी मला मानसिक संतोष वाटला नसता. आयुष्यात या संतोषाची किंमत सगळ्यात अधिक आहे.

सेंट्रल बॅंकेतलं काम नको म्हणून मी सोडलं, पण मुंबई सोडण्याची माझी इच्छा नव्हती. माझ्या मनाजोगतं काम मी शोधूं लागलों, आणि सुदैवानं मला तें लवकरच मिळालंहि.

रणछोडदास लोटवाला नावाच्या एका गृहस्थानीं विद्यार्थ्यांसाठीं एक वसतिगृह चालविलेलं होतं. त्याच्या सुपरिंटेंडंटची जागा त्यानीं मला देऊं केली. एके काळीं ‘ टाइम्स ऑफ इंडिया ’पेक्षांहि अधिक इरसाल ॲंग्लो–इंडियन पत्र म्हणून गाजलेलं ‘ ॲडव्होकेट ऑफ इंडिया ’ हें पत्र त्यानीं विकत घेतलं होतं, व साप्ताहिकाच्या स्वरूपात चालविलेलं होतं. या पत्रासाठीं त्यांना एक चांगला संपादकहि हवा होता. तेव्हा मी हें संपादकीय काम व वसतिगृहाची देखरेख अशा दोन्ही गोष्टी कराव्यात असं त्यांच्या माझ्यात ठरलं, व ही दोन्ही कामं मला आवडतील अशींच असल्यामुळें ता. १८ ऑगस्ट १९२३ रोजी मी लोटवाला यांच्याकडे कामावर रुजू झालों.

लोटवाला यांच्याकडे १९२४ च्या ऑक्टोबरपर्यंत मी राहिलों, व या सव्वा वर्षाच्या अवधींत माझ्या हातून लेखन व वाचन विविध आणि

विपुल झालं. ज्या वसतिगृहाची देखरेख माझ्याकडे होती तें लोटवाला यानीं काहीं एका विशिष्ट ध्येयाच्या पूर्ततेसाठीं काढून चालविलेलं होतं. ते स्वतः सोशालिस्ट मताचे होते व त्या मताचा प्रसार विद्यार्थ्यांत व्हावा अशी त्यांना तळमळ वाटत होती. ज्या ठिकाणीं राहण्याची सोय चागल्या प्रकारें होऊ शकते असं वसतिगृह काढून त्यात सोशालिस्ट मताच्या ग्रथांच्या संग्रह वाचण्यासाठीं खुला ठेवला तर तेथें येणाऱ्या विद्यार्थ्यांकडून त्या साहित्याचं वाचन सहजच होईल अशी त्यांची कल्पना होती. वसतिगृहाची देखरेख माझ्याकडे आली, त्या बरोबरच तेथील ग्रथसग्रहाची आवड विद्यार्थ्यांत उत्पन्न करण्याचं कामहि माझ्याकडे आलं. सोशालिस्ट मताचं तत्त्वज्ञान मी त्या वेळेपर्यंत वाचलेलं नव्हतं. त्यामुळें वसतिगृहातील त्या पुस्तकाचा स्वतःच भरपूर उपयोग करून घ्यायचं मी ठरवलं. मार्क्स, एन्जल्स, प्रिन्स क्रॉपॉट्किन्, बर्नर्ड शॉ, लॅस्की इत्यादींचे त्या सग्रहांत होते तेवढे सारे ग्रथ वाचून काढण्याचा सपाटा मी सुरू केला. मी असं ऐकलं होतं कीं, पाश्चात्य देशातल्या कांहीं नमुनेदार ग्रथालयातून प्रत्येक पुस्तकाचा व्यवस्थित सारांश काढून तो पुस्तकाबरोबरच वाचकाना मिळेल अशी व्यवस्था लायब्रेरियनकडून होत असते. अशा साराशाना Monograms म्हणतात. वसतिगृहाच्या ग्रथसग्रहांतली जीं विशेष महत्त्वाचीं पुस्तकं मीं वाचली त्याचे असे Monograms मी तयार केले. ते त्या लायब्ररींत अजून कदाचित् असतीलहि.

या वाचनाप्रमाणें 'ॲडव्होकेट ऑफ इडिया' पत्राच्या संपादनांतहि मी मनापासून लक्ष घातलं. या पत्राचं पूर्वीचं गोऱ्या कातड्याचं धोरण बदलून अगदीं जहाल राष्ट्रीय वादाच्या धोरणाचा त्यातून पुरस्कार करावयाचा होता. 'केसरी–मराठा' संस्था सोडल्यानंतर आतां तीन वर्षांनीं एक महत्त्वाचं इंग्रजी साप्ताहिक माझ्या हातीं आलं होतं. त्याचा मी भरपूर फायदा घेऊं लागलो. वृत्तपत्राला शोभेलशी इग्रजी लेखनशैली कमावण्याची माझी हौस मी भरपूर भागवूं लागलों. माझ्या अग्रलेखांकडे लोकाचं लक्ष वेधत असल्याचं माझ्या प्रत्ययाला येई, व त्यामुळें अधिक चांगलं लिहिण्याचा मला हुरूप वाटे. 'ॲडव्होकेट' पत्राप्रमाणेंच 'हिंदुस्थान प्रजामित्र' हें गुजराथी दैनिक लोटवालाच्याच मालकीचं होतं (अजूनहि आहे).

त्याचं संपादन करणारे इंदुलाल याज्ञिक पुष्कळदां मला आपल्या खोलींत बोलावून घेत व मी गेल्याबरोबर तोंडातून धुराची पट्टी सोडीत हात पुढें करून ते मला म्हणत, " शाबास ! कालचा तुमचा अग्रलेख फारच छान होता. " त्याची शाबासकी मला हवीशी वाटे. कारण इंग्रजी भाषेवरच्या त्यांच्या प्रभुत्वाबद्दल मला त्याचा हेवा वाटत असे.

इंदुलाल याज्ञिक याचं त्या वेळचं चित्र मी येथें काढलं तर किसान चळवळीचे एक अग्रगण्य पुढारी म्हणून त्यांना आज ओळखणाऱ्या लोकाना तें खरंदेखील वाटणार नाहीं. ते सभाषणाच्या वेळीं जितक्या अस्खलित रीतीन सुदर इंग्रजी बोलत असत तितकाच त्यांच्या वागण्याचा व राहण्याचा थाट त्या वेळीं अस्खलित ( बिनचूक ) इंग्रजी होता. बूट, विजार, शर्ट-स्लीव्ह्स्, अगदीं रेषेंत बसविलेला नेकटाय आणि तोंडांत धूम्रनलिका अशा ऐटींत स्वारी सपादकीय खुर्चीवर बसलेली असायची. त्यांचा दुपारचा खानादेखील एका बड्या हॉटेलांतून येऊन दाखल व्हायचा. मी माझ्या खोलीत काम करीत असतांना बशांवर काट्याचमच्यांचे आवाज झालेले मला ऐकू येऊं लागले कीं मी समजत असे एक वाजला ! आणि १९२३ साली अशा प्रकारें नखशिखान्त साहेब बनलेला हा गृहस्थ थोड्याच दिवसापूर्वी गांधींच्या असहकारितेच्या चळवळींतला आघाडीवरचा सेना-नायक व कट्टर गांधीभक्त होता ! परंतु, त्यांची गाधीभक्ति जी उडाली ती अगदीं उलट टोंकाला जाऊन तिचं गांधीविद्वेषात आतां रूपांतर झालं होतं. 'हिंदुस्थान–प्रजामित्र' या पत्रांतून त्यानीं गांधींवर टीकेचा नुसता भडिमार सुरू ठेवला होता. खासगी सभाषणांत गाधींच्या राजकारणाचा विषय निघाला म्हणजे तर जहरी कुचेष्टा करतांना त्याच्या इंग्रजी वक्तृत्वाला असा भर येई कीं कांहीं विचारू नका ! आणि याच इंदुलाल याज्ञिकना मी १९३७ साली मजुराच्या एका प्रचंड सभेत बोलतांना मुंबईस पाहिलं तें खादीचं टाचकं धोतर, नेहरूछाप सदरा, जाकीट, व गाधी टोपी अशा वेषात !

वसतिगृहाची व्यवस्था व ' ॲडव्होकेट'चं संपादन या कामात माझा बहुतेक वेळ जात असे. याखेरीज आणखी कांहीं लेखन चालू ठेवण्या-इतकी सवड मला नव्हती, आणि तशी इच्छाही फारशी नव्हती.

परंतु एके दिवशीं रात्रीं माझ्या खोलीच्या दारावर कोणीतरी टकूटक् केलं.

मी म्हटलं, " या आत "

आणि मी पाहतो तों माझ्यापुढें दुसरं कोणी नसून पूर्वीच्या 'प्रभात' मासिकाचे चालक केसरीनाथ धुमे होते.

गेल्या पाचसहा वर्षांत बराच फरक झाला होता त्यांच्यांत. साहेबी थाटाचे कपडे जाऊन त्यांच्या जागीं साधा देशी पोपाख आला होता आणि महागाईची सफेत सिगारेटची जागा आता कडक विडीन घेतली होती.

मी विचारलं, " काय धुमेसाहेब, ठीक आहे ? "

ते हसत म्हणाले, " कसच्च ठीक ? रखडतो आहे. "

" बरं, हल्लीं करतां काय ? "

" करतो काय तें राहूं द्या. एक गोष्ट करणार आहे; आणि तुम्ही मदतीचं आश्वासन दिलंत तरच ती मला करता येणार आहे. "

मी म्हटलं, " बोला. "

" एक मराठी साप्ताहिक काढणार आहे. "

मी विचारलं, " चालेल का चागलं ? "

" अस चालवून दाखवितो कीं बघा तरी. पण तुमच्या लेखणीचा भरपूर आधार पाहिजे. "

" नाव काय ठरविलं आहे साप्ताहिकाचं ? "

ते म्हणाले, " विनोद. "

# १४

'विनोद' साप्ताहिकाचं स्वरूप त्याच्या नांवाला शोभेल असच होतं. राज-कारणादि गंभीर विषयांची चर्चा त्यात फार थोडी येत असे. प्रचलित विषयाबद्दल चर्चा करायचीच झाली तर तिला विनोदी स्वरूप देऊनच केली जात असे. नाटक-सिनेमा इत्यादि करमणुकीच्या विषयाना प्राधान्य दिलं जात असे. वाचकाच्च मनोरजन व करमणूक करण्याचंच या साप्ता-हिकाचं धोरण होत.

त्या वेळीं 'विविध-वृत्त' निघालेलं नव्हतं. 'चित्रा'चे अगदीं पहिले सपादक रागणेकर हे सुद्धा त्या वेळीं फार तर इंग्रजी शाळेंतल्या पहिल्या दुसऱ्या इयत्तेत असतील. परंतु कै. अच्युतराव कोल्हटकर हे तेव्हां एक साप्ताहिक काढीत असत. त्याचं नाव आतां मला नक्की आठवत नाही. शिवाय अनंत हरी गद्रे याचं 'मौज' नावाचं साप्ताहिक त्या वेळीं विशेष लोकप्रिय झालेलं होतं. या दोन साप्ताहिकाशीं शर्यत करून 'विनोद'ला आपल स्थान उत्पन्न करून टिकवायचं होतं. अच्युतराव कोल्हटकर हे माझे आप्त होते त्याचा माझ्यावर लोभहि फार होता. १९२४ सालीं त्यांची

लोकप्रियता पुष्कळच ओसरली होती. त्यांचं 'संदेश' नावाचं दैनिक ऐन भरभराटींत असताना एक काळ असा होऊन गेला होता कीं, ते मराठी वाचकाच्या गळ्यातले ताईत होते. 'संदेश' वाचल्याखेरीज लोकांना सकाळचा चहा सुचत नसे; आणि अच्युतरावाचं व्याख्यान म्हटलं कीं, श्रोत्यांच्या झुंडीच्या झुंडी सभास्थानी लोटत असत. लोकप्रियतेच्या लाटेच्या ऐन माथ्यावर तरंगणाऱ्या अच्युतरावाना मला अगदीं जवळून निरखून पाहण्याची संधि पुष्कळ मिळाली होती. त्या मानाच्या स्थानावरून ते कोणत्या कारणानीं कसे घसरले तो सारा इतिहास माझ्या डोळ्यानीं मीं प्रत्यक्ष पाहिला होता. त्याच्या चित्रविचित्र चरित्रातली 'पानिपतची लढाई' १९१९ सालीच होऊन गेली होती. मी मुंबईस थोडा स्थायिक झालो व 'विनोद' पत्रात लिहू लागलो त्या वेळीं ज्याचं राज्य खालसा झाल आहे, ज्याचीं सत्ता आणि दरारा कुणी मानीत नाही, व नामशेप झालेल्या वैभवाचीं उरलीसुरली चार चिन्हं अंगावर घालून जो दिवस काढीत आहे अशा एखाद्या राजासारखी अच्युतरावाची अवस्था झालेली होती.

परंतु, वर्तमानपत्री लेखनाचे असे एकदोन जबरदस्त गुण अच्युतरावाच्या अंगीं होते कीं, त्याच्या मावळ लागलेल्या प्रकाशानं देखील लोकाचे डोळे दिपावेत. वृत्तपत्राला साजेशी काही एका स्वतंत्र प्रकारची चटकदार शैली त्यानीं कमावलेली होती. विषय क्षुद्र असला तरी त्याबद्दल घोळून घोळून लिहून वाचकाना कसं झुलवावं तें त्याना अवगत होतं. या बाबतींत 'काळ'कर्ते शिवरामपंत परांजपे आणि अच्युतराव यांच्यातला साम्यविरोध नेहमीं मनोरंजक वाटे. दहावीस कागदाच्या कपट्याचा चिमटीत मावेल एवढा बोळा तोंडात घालून त्यातून पाचपंचवीस वार लांबीच्या विविधरंगी कागदी सुरळ्या तोंडाबाहेर उपसून काढणाऱ्या जादूगाराची उपमा दोघानाहि शोभण्यासारखी होती. फरक मात्र असा कीं, परांजप्याच्या कल्पना काव्याच्या फार उंच पातळीवरच्या, आणि शब्द भारदस्त व संस्कृतप्रचुर; आणि उलट, कोल्हटकराच्या कल्पनाची पातळी खालची व भाषाहि सरळ आणि राकट मराठी. परंतु या फरकामुळेंच परांजप्याचं 'काळ' पत्रं फक्त मध्यमवर्गीय बुद्धिजीवि वर्गाचं पत्र ठरलं, पण अच्युतरावानीं जे जे दैनिक अगर साप्ताहिक काढलं तें तें सामान्य लोकाचं आवडतं पत्र ठरलं.

अच्युतरावाच्या चटकदार लेखनशैलीप्रमाणें त्यांच्या अंगचे आणखी जे दोन गुण माझ्या लक्षात विशेषेंकरून आले ते म्हणजे त्यांची दुर्दम्य आनंदी वृत्ति, आणि कष्टाची तयारी. त्याचं खासगी संभाषणांतलं बोलणदेखील उंच स्वरांतलं असे, आणि बोलताना सारख मधूनमधून त्याचं हसणं चाले तें सातमजली. मला कितीदां तरी असा अनुभव आला कीं ते किती अड-चणींत व फिकीरींत आहेत तें मला माहीत असाव, परंतु एकीकडे विपत्तीला तोंड कस द्यावं याचा मनातल्या मनांत विचार करीत असतांना भेटायला आलेल्या मडळींशीं नित्याप्रमाणें मोठमोठ्यादा गप्पा मारणारे व अगदीं पोट धरधरून हसणारे अच्युतराव माझ्या दृष्टीला दिसावेत. त्याच्या असामान्य धैर्याच्या आणि आशावादित्वाच्या या चित्राप्रमाणें त्यांच्या कष्टाळूपणाचं चित्रहि मीं पुष्कळदां पाहिल. वर्तमानपत्राचा मजकूर रात्रभर जागून लिहून देऊन मग छपाईच्या यत्राच्या फळीचीच शय्या करून पडलेल्या अच्युतरावांच्या अंगावर सकाळचीं कडकडीत उन्हं पडलेली मला पुष्कळदा दिसल्याचं आठवतं.

अच्युतरावांच्या या गुणाच इतक्या विस्तारानं वर्णन केलं तें एवढंच सुचविण्यासाठीं कीं, १९२३ सालीं मी धुम्यानीं काढलेल्या 'विनोद' साप्ता-हिकात लिहू लागलों त्या वेळीं अच्युतरावाच्या नावाभोवतीं पूर्वीचं प्रकाश-वलय जरी उरलेलं नव्हतं तरी वृत्तपत्राच्या क्षेत्रात त्यांच्या पत्राची मातबरी होतीच, आणि त्यांच्या पत्रासमोर 'विनोद' पत्र जोमानं उभं राहिलेलं पाहून मला माझ्या लेखनशक्तीचा थोडासा प्रत्यय आलास वाटलं तर त्यात माझी चूक नव्हती.

अनंत हरी गद्रे यांच्या 'मौज' पत्राचा त्या वेळीं बराच बोलबाला होता. हे गृहस्थ काही दिवस अच्युतरावाच्याकडे होते, व त्याच्या सहवा-साचा याच्यावर विपरीत परिणाम झाला होता. अच्युतरावांचा व्यासग व अनेक दोषातूनहि वर डोकावणारी कडक राष्ट्रीय वृत्ति या दोन्ही गुणाचा गद्र्यांच्या ठिकाणीं अभाव होता; व त्यामुळें सरळ खणखणीत लिहिण्याची अच्युतरावाची तऱ्हा यानीं उचलली ती विपरीत आणि धोक्याच्या स्वरू-पाची मात्र बनली. अमर्याद स्तुति, ग्राम्य विनोद, असभ्य वैयक्तिक निंदा याच गोष्टी त्याच्या 'मौज' पत्राचं भाडवलं होऊन बसल्या होत्या.

'विनोद' आणि 'मौज' या दोन साप्ताहिकांत काहीं दिवस गाजण्या-सारखा सामना व्हायची वेळ आली ती यामुळेंच.

त्या वेळीं 'गधर्व नाटक मंडळी' व श्रीयुत शंकरराव सरनाईक यांची 'यशवंत सगीत मडळी' अशा दोन्ही नाटक कंपन्याचे मुक्काम मुंबईत एकदम पडले होते. यशवंत संगीत मंडळीची जाहिरात करण्याचं काम गद्रे यांच्याकडे होतं; व त्यासाठीं यशवंत संगीत मडळींतल्या नटाची अफाट स्तुति, व गंधर्व नाटक मंडळीची पर्यायानें निदा अशी दुहेरी मोहीम त्यानीं आपल्या 'मौज' पत्रातून चालविली होती. श्रीयुत बाल-गंधर्व याच्या कलेचा मी एक अभिमानी व चाहता होतों; आणि श्रीयुत सरनाईक याच्या गाण्याचं वाजवी तेवढं कौतुक जरी मला वाटे तरी 'मौज' मध्यें चाललेली त्यांची व त्याच्या नटांची तारीफ त्यांच्याच उत्कर्षाला घातक व वृत्तपत्रांच्या प्रतिष्ठेला आणि स्वतंत्र बाण्याला उणेपणा आणणारी आहे असं माझी मनोदेवता मला सांगत होती. म्हणून या बाबतींत 'मौज'च्या लिखाणावर मीं 'विनोद' पत्रातून जोराचा हल्ला चढविला. शंकरराव सरनाईक व त्यांचे इतर नट याच्या गायनाचा खरा दर्जा व त्यांच्या ठिकाणच्या अभिनयकलेचा सपूर्ण अभाव यांची अगदीं शास्त्रशुद्ध चिकित्सा मी जेव्हा करूं लागलो तेव्हा त्याच्या पक्षाचं धाबं चांगलच दणाणलं, आणि गद्रे यानीं त्याच्या पत्राच्या कनिष्ठ दर्जाला शोभेल अशी वैयक्तिक टीका, टवाळी, निदा सुरू केली. 'विनोद' व 'मौज' या दोन पत्रातील हा सामना काहीं दिवस चांगलाच गाजला.

परंतु, या वादातलं माझ लिखाण तात्पुरत्या महत्त्वाचं होतं. 'विनोद' साप्ताहिकाकडून काहीं तरी चागली भरीव साहित्यविषयक कामगिरी व्हावी अशी माझी तीव्र इच्छा होती. या दृष्टीनच १९२४ च्या वसंत ऋतूंत 'विनोद'चा खास 'ललितकला' अंक आम्ही काढला. 'झंकार'च्या निम्या आकाराच्या सुमारें शभर पानाच्या या अंकातला जवळजवळ पाऊण मजकूर मी स्वतः लिहिला होता. निरनिराळ्या लेखाखाली व गोष्टींखालीं निरनिराळीं टोपण नावं मी अर्थातच घातली होतीं. या अंकात 'कुडींतील प्राण' ही माझी गोष्ट ज्या 'अंगठ्याच्या ठशा'नें मी माझ्या साहित्यिक आयुष्याला प्रारंभ केला त्या गोष्टीनंतरची तिसरी किंवा चौथी असेल.

'महाराष्ट्रीय रंगभूमि' अशा मथळ्याखालीं मी एक विवेचक लेख या अंकांत लिहिला होता. माझ्या महीनिशीं लिहिलेला 'महाराष्ट्रीय संगीत' हा त्या अंकांतला सर्वोत्कृष्ट लेख होता. केवळ या एका लेखासाठीं 'विनोद'चा तो खास अंक सगीतप्रेमी लोकानीं अजून काळजीपूर्वक जपून ठेवलेला माझ्या पाहण्यात अनेक ठिकाणीं आला आहे.

मुबईस आल्यापासून समाजसत्तावादावरील पुष्कळसे ग्रंथ अभ्यासपूर्वक वाचण्याची सधि ज्याप्रमाणें मला मिळाली त्याप्रमाणेंच आणखी एका नवीन विपयाकडे माझं लक्ष गेल. हा विपय म्हणजे 'सततिनियमना'चा. मनोवाञ्छित संतति, आणि कम्युनिस्ट तत्त्वानुसार केली जाणारी सामाजिक पुनर्घटना या दोन विपयाचा अन्योन्य सबध निकटचा असल्याचं माझ्या लक्षांत आल्यापासून संततिनियमनाचा पुरस्कार करणाऱ्या इंग्रजी ग्रथाचं परिशीलन मी सुरू केलं. या बाबतींत लोटवाला याची मतं पूर्ण प्रागतिक असल्यामुळें त्यानीं वसतिगृहाच्या लायब्ररींत या पुस्तकाची भर टाकण्यास मला ताबडतोब परवानगी दिली. इतकच नव्हे तर त्याच्या प्रोत्साहनामुळें 'इंडियन बर्थ कन्ट्रोल लीग' नावाची सस्थाहि मी स्थापन केली.

या सस्थेचं प्रचारकार्य करताना इग्लड, अमेरिकेंतील तत्सदृश्य मोठमोठ्या सस्थाशीं माझा पत्रव्यवहार झाला. या निमित्तानच अमेरिकेतील स्त्रियांच्या चळवळीसाठीं ज्यांनीं निकराचा झगडा केला व कारागृहवासहि भोगला त्या मार्गरेट सॅगर या बाईशीं माझा पत्रपरिचय झाला. पुढें 'Sex Problem in India' नावाचं जे इग्रजी पुस्तक मी लिहिलं त्याला प्रस्तावना लिहिणाऱ्या विदुषी याच होत.

बर्थ कंट्रोल लीगच्या प्रचारासाठीं 'बर्थ कंट्रोल' या नावाचं एक अगदीं छोटं इग्रजी पुस्तकहि मीं लिहिलं. या पुस्तकाच्या बाबतींत एक गंमतीची आठवण सांगण्यासारखी आहे ती अशी. ज्या वसतिगृहाची देखरेख माझ्याकडे होती त्यांत ओबायदुल्ला अन्सारी नावाचा एक पंजाबी मुसलमान विद्यार्थी होता. सुविख्यात पुढारी दिल्लीचे डॉ. अन्सारी याचा हा जवळचा नातेवाईक होता. तो त्या वेळीं ग्रॅट मेडिकल कॉलेजात शिकत असे. त्याचा स्वभाव अत्यंत प्रेमळ असल्यामुळें माझा व त्याचा फार परस्पर लोभ जडला होता. महाराष्ट्रीय संस्कृति, महाराष्ट्रीय आचारविचार, महाराष्ट्रीय

संगीत इत्यादींवर त्याची मोठी भक्ति. परंतु जुनाट मुसलमानी वृत्तीचे बरेच विचार त्याच्या ठिकाणीं प्रगट स्वरूपात आढळून येत. बर्थ कंट्रोल लीगचा माझा प्रचार त्याला बिलकुल संमत नव्हता. सतति म्हणजे परमेश्वराची देणगी असून मनुष्यानं तिचा अव्हेर करावा हें मोठं पाप होय हा जो संततिनियमनाच्या चळवळीला विरोध करणाऱ्यांचा ठराविक मुद्दा तो त्याच्या बोलण्यात पुनः पुन्हा प्रतिपादला जात असे. 'बर्थ कंट्रोल' हे माझं छोटं इंग्रजी पुस्तक जेव्हा मी प्रथम त्याला हसत हसत दाखविलं तेव्हां 'च् च्' असं करून तो म्हणाला;

"मेरे प्यारे भाईसाब, आप ये क्या कर रहे हो! खुदा के साथ झगडा? खुदा तुम्हारा भला नही करेगा!"

तें ऐकून मी खूप खूप मोठमोठ्यान हसलों. त्याच्या अंधश्रद्धेची मला कींव वाटली. मी त्याला तसं बोलूनहि दाखवलं.

परंतु, नवल असं कीं त्याचे ते शब्द वर्ष दीडवर्षाच्या अवधींत भविष्य-वाणीसारखे ठरायचे होते!

१९२३–२४ सालात 'American Birth Control' नांवाच्या मासिकात माझे लेख नियमानं येऊं लागून मला अगदीं थोडाच कां होईना परंतु आंतरराष्ट्रीय लेखकाचा दर्जा मिळविता आला होता, व माझं छोटं पुस्तक 'बर्थ कंट्रोल' प्रचाराच्या दृष्टीनं पुष्कळच यशस्वी ठरलं होतं; परंतु पुढें होणाऱ्या एका घाताची ही सारी तयारी होती!

त्या घटनेचं वर्णन पुढें येणार आहे. तत्पूर्वी मुंबईचा माझा मुक्काम कसा अकल्पित रीतीनं संपला ते सांगितलं पाहिजे.

'अमेरिकन बर्थ कंट्रोल' या मासिकांत संततिनियमनाच्या प्रश्नावर हिंदी लोकाच्या दृष्टीनं विचार करून लिहिणारा पहिला हिंदी लेखक मीच होतो. त्या कारणानं माझ्या लेखनाकडे तिकडील लोकांचं फार लक्ष वेधलं गेलं. मिसेस मार्गारेट सॅगर व त्यांची सहकारी मंडळी यांना तर माझे लेख इतके आवडले कीं, १९२४ सालच्या नोव्हेंबर महिन्यांत जिनीव्हा शहरीं संततिनियमनविषयक जी मोठी आंतरराष्ट्रीय परिषद भरायची होती तिला हिंदुस्थानतर्फे मी हजर राहावं असं आग्रहाचं निमंत्रण त्यांनीं मला पाठ-विलं. मला अर्थात् त्यांना कळविणं भाग होतं कीं,

" निमंत्रण पाठवून आपण माझा जो गौरव केलांत त्याबद्दल मी आपला फार आभारी आहे. परंतु, इतक्या दूरची सफर करण्यासारखी माझी आर्थिक परिस्थिति नसल्यामुळें परिषदेस हजर राहण्याचा बेत मला करता येत नाहीं याबद्दल मला फार खेद होतो. मात्र, परिषदेपुढें वाचले जावेत म्हणून ' Indian Mother ' व 'Eugenics and Economics' असे दोन निबंध मी तयार करून पाठवीन. "

हें माझं पत्र मिसेस् सॅंगर याना पोंचताच त्यानीं मला लॅगेज केबल करून कळविलं कीं,

" तुम्ही स्वतः परिषदेस हजर राहाल तरच आम्हाला विशेष आनंद होईल. तुमच्या प्रवासखर्चाची तरतूद मी करीत आहे. आमच्या अमेरिकन लीगच्या एक सभासद Miss Mary Winsor या जगप्रवासास गेल्या असून आठदहा दिवसांत मुंबईस पोंचतील. मुंबईच्या मुक्कामांत तुमची गाठ घेऊन तुम्हाला पाचशें डॉलर्स द्यावयास मी त्यांना कळवीत आहे. तुम्ही आलेंच पाहिजे. "

आणि या तारेप्रमाणें पुढें दहाच दिवसांनीं विन्सर मला भेटल्या व पांचशें डॉलर्सचा चेक त्यानीं माझ्या स्वाधीन केला !

इतक्या गोष्टी घडेपर्यंत जिनीव्हाच्या परिषदेस मी जाईन अशी मीं कुणाजवळ वाच्यता केली नव्हती. परंतु, आता माझ्या जाण्याबद्दल अनिश्चितपणा कांहींच राहिला नव्हता. पासपोर्ट काढण्याच्या व इतर तयारीला मी हळूहळू लागलो. ऑक्टोबरच्या तिसऱ्या आठवड्यात निघून सुमारें तीन महिन्यांची युरोपची सफर करून येण्याची मीं योजना केली.

परंतु युरोपला जाण्याचा जमून आलेला हा योग सिद्धीस गेला नाही !

१९२४ च्या सप्टेंबर महिन्याच्या अखेरीस मी मुंबई सोडली. परंतु, परिषदेसाठीं जिनिव्हास जाण्याऐवजीं मी नागपूरला गेलो !

याच कारण म्हणजे माझ्या आयुष्यातील योगायोगाच्या अनेक उदाहरणापैकीं एक उदाहरण म्हणावं लागेल.

# १५

जिनीव्हा येथील आतरराष्ट्रीय परिषदेस हजर राहून तीन महिन्याची युरपची सफर करण्याची चालून आलेली संधी मी दूर लोटली हें सकृद्दर्शनीं चमत्कारिक वाटण्यासारखं आहे. ज्यांनीं मला निमत्रण केलं होतं त्यांच्या खर्चानं माझी सफर व्हायची होती; आणि माझ्या जाण्याचा बेत नक्की ठरून पोसपार्ट काढण्याच्या वगैरे तयारीला मी लागलों तो फारच आनंदानं लागलों होतों. अर्थात् कधीं न मिळणारीं अशी ती संधि मी सुखासुखीं कशी दूर लोटली असेल ? तसं करण्याचं एक सबळ कारण होत. तें कारण अस कीं, तीन महिन्यांसाठीं युरपला जायचं, कीं नागपूरला कायमची नोकरी मिळत होती ती पत्करायची असा माझ्यापुढें पेच होता; व माझ्या एकंदर आयुष्याच्या स्थिरतेच्या दृष्टीनच त्याचा विचार करणं मला प्राप्त होतं.

मी १९२३ सालच्या पावसाळ्यांत मुंबईस आलों तेव्हाच नागपूरच्या हिस्लॉप कॉलेजची ' तत्त्वज्ञानाचा अगर अर्थशास्त्राचा प्रोफेसर नेमायचा आहे ' अशी जाहिरात मी टाइम्समध्यें पाहिली होती; व ती पाहिल्यावर

अर्जहि केला होता. त्या माझ्या अर्जाचं एकदीड महिन्यानं उत्तर आलं होतं कीं, " या वेळीं अर्थशास्त्राचा प्रोफेसर नेमून आम्ही आमची गरज भागविली आहे, तेव्हां तूर्त तुमचा अर्ज तसाच ठेवून देण्यात आला आहे. " मग कांहीं दिवसांनीं मी नागपूरच्या त्या जागेची गोष्ट हलके हलके विसरूनहि गेलों होतों.

परंतु, माझ्या जिनीव्हाच्या सफरीसंबंधीं मिस् मेरी विन्सर यांनीं मिसेस मार्गरेट सॅंगर यांच्या सांगण्यावरून माझी मुद्दाम मुंबईस गांठ घेऊन माझ्या हातीं पांचशें डॉलर्सचा चेक दिला, त्यानंतर बरोबर आठव्याच दिवशीं—ता. २२ सप्टेंबर १९२४ रोजीं नागपूरच्या हिस्लॉप कॉलेजचे प्रिन्सिपल गार्डिनर यांचं मला तातडीचं पत्र आलं कीं,

" फिलॉसफीच्या प्रोफेसरची जागा आम्हाला भरावयाची आहे. तुमचा गतवर्षीचा अर्ज आमच्यापुढें आहे. तुम्ही पुन्हा अर्ज करण्याचें कारण नाहीं. फक्त तुम्ही ता. १ ऑक्टोबरपासून कामावर रुजू होऊं शकाल कीं नाहीं तें ताबडतोब कळवा. "

या पत्रानं माझ्यापुढें चांगलाच पेंच उभा केला. आंतरराष्ट्रीय परिषदेसाठीं जिनीव्हास जाण्याची मला अत्यंत उत्कट इच्छा होती. परंतु त्या इच्छेच्या आहारीं जाऊन अगदीं मनाजोगती कॉलेजांतली कायमची नोकरी पत्करून आयुष्याला स्थिरता आणण्याची अशी चांगली संधि एकदां हातची घालविली तर पुन्हा लवकर येणार नाहीं हेंहि मला स्पष्ट दिसत होतं. पुष्कळ विचार करून मी प्रिन्सिपल गार्डिनर यांस कळविलं कीं,

" ता. १ ऑक्टोबरपासून मी कामावर रुजू होऊं शकेन. "

मग मीं मिसेस् मार्गरेट सॅंगर यांस दिलगिरीची केबल पाठवली आणि पांचशें डॉलर्सचा तो चेकहि साभार परत केला. परिषदेपुढें वाचण्यासाठीं दोन निबंध मी तयार करीत होतों तेहि लगोलग पूर्ण करून परिषदेच्या चिटणिसाकडे रवाना केले.

आणि इतकं सर्व करून मी नागपूरला गेलों. मी ' ॲडव्होकेट ' पत्राचं व वसतिगृहाचं काम सोडून निघालों म्हणून लोटवाला यांना फार वाईट वाटलं. परंतु मी नागपूरला जाण्यांतच माझं खरं हित आहे हें त्यांना स्पष्ट दिसत असल्यामुळें त्यांनीं मला आनंदानं निरोप दिला.

नागपूरला मी जाऊन दाखल झालो तेव्हा एका नवीन ग्रंथाच्या हस्त-लिखिताचीं कांहीं पानं माझ्या बॅगमध्यें होतीं. तो ग्रंथ म्हणजे ज्याबद्दल डॉ. गणपुले यांचा आज किती तरी दिवस सतत तगादा लागला होता तो ' मानसोन्नति ' हा ग्रंथ होय. डॉ. गणपुले यांच्यासाठीं लिहिलेला ' मानसोपचार ' हा ग्रंथ इतका विद्वन्मान्य व लोकप्रिय झाला होता कीं, त्या ग्रथाच्या अखेरीस दिलेल पुढच्या ग्रंथाच अभिवचन केव्हां पुरं करता अशी अनेक वाचक गणपुले यांच्याकडे पुनः चौकशी करीत. प्रथम मलाहि वाटलं होतं कीं, ' मानसोपचारा 'चा मूलभूत तत्त्वांच्या व्याव-हारिक उपयुक्ततेवर आणखी एक ग्रंथ होईल इतक खरोखरीच लिहिता येईल. म्हणून डॉ. गणपुल्यानीं पुढच पुस्तक लिहिण्याची गोष्ट काढली कीं मी म्हणे, " आपल्याला पुस्तक लिहायचं आहे यात सशयच नाही. परंतु सध्या त्याकडे माझं मन लागत नाहीं. थोडे दिवस जाऊ द्या. "

पुढें मी सिंध हैदराबादहून परत आलों व मला बरीचशी सवड होती, तेव्हा गणपुल्यांनीं आग्रहाचा जरा जास्त जोर केला, आणि मी दुसऱ्या ग्रंथासाठीं माहिती जमवू लागलों. ती जमविण्यासाठीं वाचन करता करता मला वाटूं लागलं कीं, तीनशें पानांचा ग्रथ लिहिण्याची डॉ. गणपुल्याची कल्पना अमलात आणण कठीण आहे. खरोखरच सागण्यासारख्या ज्या शास्त्राच्या जेवढ्या महत्त्वाच्या गोष्टी उरल्या होत्या तेवढ्यांचाच उपयोग करून पुस्तक लिहावयाचं म्हटलं तर तें फार तर दीडशें पानाचं होईल. उगीच पाल्हाळानं लिहिलेले पुष्कळ अमेरिकन ग्रंथ डॉक्टरांच्या संग्रहीं होते. परंतु त्या जातीचं पुस्तक लिहिण्याची माझी इच्छा नव्हती.

परंतु, माझं म्हणणं डॉक्टरांना कांहीं केल्या पटेना. ' मानसोपचारा '-सारखा आणखी एक लठ्ठ ग्रथ वाचकांच्या हातीं द्यावा या कल्पनेचा त्यांना जो मोह पडला होता तो जबरदस्त होता. या मतभेदामुळें नवा ग्रंथ लिहिण्याबद्दलची माझी हौस थंडावूं लागली, आणि स्पष्ट नकार देऊन डॉक्टरांचं मन दुखविण्याचा तर मला धीर होईना. मग मी कांहीं तरी सबबी सागून कालहरण करूं लागलों. परंतु हें .मी किती दिवस करणार ? शेवटीं डॉक्टरांना मी असहि स्पष्ट सांगितल कीं, तुम्ही म्हणतां तो आरा-खडा घेऊन पुस्तक लिहिलं तर तें जरी अगदीं माझ्या लेखणींतून उतरलं

तरी माझ्या मनाजोगं होणं शक्य नाहीं, अन् त्याचा खपहि 'मानसोपचारा 'सारखा व्हायचा नाहीं. परंतु इतका स्पष्ट इशारा देऊनहि डॉक्टर जेव्हां आपला आग्रह सोडीनात तेव्हां मी म्हटलं, 'ठीक आहे, लिहितों मी; पण तें केवळ तुमच्या संतोषासाठीं. ग्रंथाच्या लोकप्रियतेची अगर खपाची जबाबदारी माझ्यावर बिलकुल नाहीं अस समजा.'

डॉक्टर म्हणाले, 'कबूल'; आणि मुबईस असतांनाच १९२४ च्या जून महिन्यात मी 'मानसोन्नति' हा ग्रथ लिहिण्यास प्रारंभ केला.

ही सर्व हकीगत इतक्या विस्तारान सांगण्याचं प्रयोजन इतकंच कीं, 'मानसोपचार' या माझ्या ग्रंथाबद्दल अगदीं उत्कृष्ट ग्रंथ म्हणून जसा मला अभिमान वाटतो तसा 'मानसोन्नति' या ग्रथाबद्दल वाटत नाहीं. तें पुस्तकहि लोकप्रिय झालं आणि चागलं खपलं. पुस्तकावरचे वृत्तपत्रातले व खाजगी अभिप्राय दाखवून डॉ. पुष्कळदा मला म्हणत, "बघा, अन् तुम्ही म्हणत होतां...!". यावर मी हसत असे. परंतु केवळ लोकांना आवडल म्हणून तें पुस्तक चागलं म्हणायला मी मनातून कधींच तयार नव्हतों आणि अजूनहि नाहीं. शास्त्रीय पुस्तकाच्या विषयाशीं बुद्धीनं तादात्म्य होऊन अवघड विषयावरहि सुगम प्रतिपादनाची अन् आकर्षक भाषाशैलीचीं आवरण चढविण्यासाठी लिहितांना काहीं एक अनिर्वचनीय आनद होत असतो. 'मानसोपचार' या ग्रंथानं मला तो भरपूर दिला. उलट 'मानसोन्नति' लिहितांना अशा आनंदाचा अनुभव मला आला नाहीं.

मात्र तें कसहि असलं तरी मी नागपूरला गेलो तो 'मानसोन्नति' पुस्तकाची पूर्तता शक्य तितक्या लवकर करण्याचा निश्चय करून.

पण मुंबईहून हलण्याच्या आधीं थोडेच दिवस दुसऱ्या एका ग्रंथाचा विचार माझ्या मनांत सुरू झाला होता.

ता. २८ जुलै १९२४ रोजीं वृत्तपत्रांतल्या एका जाहिरातीकडे माझे लक्ष वेधलं गेलं. इंदूर येथील 'महाराष्ट्र साहित्य सभे'नं 'सुप्रजाजनशास्त्र' या विषयावर सर्वोत्कृष्ट निबंध लिहिण्यास पाचशें रुपयांच बक्षीस जाहीर केलं होतं. बक्षिसाची योजना अशी होती, कीं ज्यांना प्रयत्न करायचा असेल त्यानीं या ग्रंथाच पहिलं प्रकरण, संबंध ग्रथाचा आराखडा, आणि आधारभूत ग्रंथाची यादी येवढंच हस्तलिखित तयार करून तें नमुन्यादाखल

पाठवायचं. बक्षिसाचा निकाल या नमुना प्रकरणावरूनच व्हायचा होता, व ज्याची निवड होईल त्यानं ठराविक मुदतींत सबंध ग्रंथ पुरा करून दिला म्हणजे त्याला पाचशें रुपये देण्यांत यायचे होते.

ही जाहिरात पाहताच मी निश्चय केला, कीं आपण प्रयत्न करायचा.

माझ्या या निश्चयाचं मुख्य कारण होतं तें असं कीं, निबंधासाठीं जो विषय नेमला होता त्या विषयाचं वाचन मुंबईच्या मुक्कामांत माझ्याकडून आधींच सहजासहजीं पुष्कळ झालेलं होतं. 'संततिनियमन' हा विषय 'सुप्रजाजनशास्त्र' या मोठ्या विषयातून एक शाखारूपवाद म्हणून उद्‌भवतो; व त्यामुळें पहिल्या विषयाचा अभ्यास करतां करतां दुसऱ्याहि विषयावरील कित्येक ग्रंथ मी नुसते वाचलेच नव्हते, तर त्यांचीं व्यवस्थित टाचणंहि करून ठेवलीं होतीं.

परंतु आतापर्यंतच्या सहजासहजीं केलेल्या वाचनाची निबंध लिहिण्याच्या दृष्टीन पुन्हां एकदा उजळणी करण आवश्यक होत, व सुप्रजाजन या विषयावर आणखी कांहीं ग्रंथ मिळाले तर त्यांचहि वाचन करणं इष्ट होत, आणि हें सगळ अगदीं ताबडतोब करायला पाहिजे होत. कारण अवधि अगदीं थोडा होता. म्हणून त्या कामाला मी लगेच लागलों. हॅवलॉक एलिसच्या सुप्रसिद्ध ग्रंथाचे सगळे भाग मी पूर्वीच वाचून काढले होते. परंतु त्यांच्या भरीला ' Sex in Relation to Society', व The Task of Social Hygiene' या दोन ग्रंथांचा मीं आता अभ्यास केला. शिवाय ' The Problems in Eugenics, ', Karl Pearson यांचं ' The Academic Aspect of the Science of National Eugenics ' पी. एस्. हार्म्सवर्थ याच्या ग्रंथाचा पाचवा व्हॉल्यूम, Selleby चं 'Prospects of Eugenics ', पॉलचं ' Laws of Births and Deaths ', ईस्टचं ' Mankind at the Cross Roads '--इत्यादि पुस्तकांचं वाचन करून त्यांचीं टिपणं मी तयार केली; आणि १८९१, १९०१ आणि १९२१ अशा तीन 'सेन्सस रिपोर्टां'चा अभ्यास करून त्यांतून मला उपयोगी पडेल अशी पुष्कळ माहिती मीं गोळा केली.

आणि अशा प्रकारें निबंधाला आवश्यक त्या माहितीची जुळवाजुळव रात्रंदिवस काम करून मी पूर्ण करीत आणली त्याच सुमारास मिसेस्

मार्गरेट सॅगर याच्याकडून मला पांचशें डॉलर्स मिळाले, व जिनीव्हाला जाण्याचा बेत मी मुक्रर केला. जिनीव्हाला गेल्यावर मी तिकडेच तीन महिन्याची सफर करणार होतों तेव्हा निबंध लिहिण्याचं काम तिकडच्या प्रवासांत माझ्या हातून होईल हें शक्यच नव्हतं. अर्थात् इदूरच्या त्या बक्षिसासाठीं प्रयत्न करण्याचा बेत मला रद्द करावा लागला होता.

परंतु जिनीव्हाकडे वळलेलं माझं तोंड अकल्पित रीतीनं जेव्हां नागपूरकडे वळलं तेव्हा अर्थातच निबंध लिहिण्याचा विचार मी पुन्हा कायम केला, आणि नागपूरला जातांना 'मानसोन्नति'च्या पहिल्या दोनतीन प्रकरणाचं हस्तलिखित जसं मी बरोबर घेतलं, तसंच सुप्रजाजननशास्त्रावरील ग्रंथासाठीं गोळा केलेलं सारं साहित्यहि बरोबर घेतलं. नागपुरास पोंचल्यावर गणपुल्याच्या पुस्तकाला तात्पुरती रजा देऊन निबंधाचं पहिलं प्रकरण लिहिण्याच्या कामाला जोरानं लागायचं असं मी मनाशीं ठरविलं होतं.

नागपूरच्या हिस्लॉप कॉलेजांत मी आपल्या कामावर रुजू झालों तो ता. १ ऑक्टोबर १९२४ रोजी. तेथें जाऊन पाहतो तो इंटरच्या वर्गाचं लॉजिक, बी. ए. च्या वर्गाची फिलॉसफी आणि फिलॉसफी विषय घेऊन एम्. ए. ला बसणाऱ्या विद्यार्थ्यांचेहि तास इतकं काम माझ्याकडे सोपविण्यात आलं होतं. दिल्लीच्या नोकरीवरून परत आल्यापासून आतापर्यंतच्या अवधींत बी. ए. व एम्. ए. च्या वर्गांना शिकवायच्या फिलॉसफीवरच्या पुस्तकाना मी स्पर्शहि केलेला नव्हता. हिस्लॉप कॉलेजातले ब्रेम्नर नांवाचे जे वृद्ध प्रोफेसर निवृत्त झाले होते, व ज्याच्या जागीं माझी नेमणूक झाली होती ते एक उत्कृष्ट अध्यापक म्हणून नावाजलेले होते. त्याच्या खुर्चीत बसून मला माझं अध्यापनकौशल्य सिद्ध करायचं होतं व लौकिक मिळवायचा होता. एखाद्या मैफलींत कोणी बडे खासाहेब गाऊन उठलेले असताना, त्याच्या मागोमाग गायला बसून रंग भरण्याचा व वाहवा मिळविण्याचा प्रसंग आला तर तरुण गायकाच्या ज्या भावना असतील त्याच माझ्या मनात त्या वेळीं असाव्यात हें साहजिकच होतं. परंतु त्यामुळेंच मला अधिक ईर्षा वाटली व माझं प्रत्येक व्याख्यान अत्यंत परिश्रमपूर्वक तयार करण्याचा मी परिपाठ ठेवला. परमुलखात प्रोफेसर म्हणून जाऊन आपली छाप बसवायची झाली तर प्रारंभीचीं पांच

सहा लेक्चर्स सरस वठली अन् विद्यार्थ्यांवर एकदां पकड बसलीं कीं मग पुढें चिंतेच कारण उरत नाहीं. हें लक्षात घेऊन हिस्लॉप कॉलेजमध्यें काम करूं लागल्यानंतर पंधरा वीस दिवस मी अतिशय परिश्रम केले. त्याचं फळहि मला मिळाल्यावाचून राहिल नाहीं. मी विद्यार्थ्यांची ब्रेम्नरची आठवण बुजवूं शकलो, अन् माझा लौकिक माझ्या कानांवर येऊं लागला.

परंतु हें करीपर्यंत ऑक्टोबरची वीस तारीख उजाडली !

आणि इंदूरच्या बक्षिसासाठीं निबंधाचं पहिल प्रकरण वेळेवर पाठवायचं तर तें उशीरात उशीरा २८ तारखेस रवाना होण आवश्यक होतं ! म्हणजे ज्या नमुन्याच्या प्रकरणावरून बक्षिसाचाच निकाल लागायचा तें लिहाय-साठीं अवघ्या सात आठ दिवसाचाच अवधि शिल्लक होता ! परंतु नमुन्या-दाखल पाठविण्याच्या प्रकरणाचा विषय माझ्या डोक्यात अगदीं तयार होता. एकदर ग्रंथाच्या रचनेची प्रकरणशः योजना देखील मी मनातल्या मनांत आंखून ठेवली होती. या सर्व गोष्टी कागदावर उतरून काढण्याचंच काय तें काम मला करायच होत. कच्ची प्रत, पक्की प्रत असल्या भानगडी न ठेवता जे एकदा लिहायचं तेंच कायमचं ठरेल अशा बेतानं, आणि कुठंहि खोडाखोड न करता अगदीं सुंदर, सुवाच्य अक्षरात लिहिण्याची जी सवय मी माझ्या लेखनाला आरंभ केल्यापासूनच बनविली होती, ती या वेळीं मला फार उपयोगी पडली. अवघ्या सात दिवसात मी 'सुप्रजाजन-शास्त्र' या विषयावरील संकल्पित ग्रंथाचं पहिल प्रकरण, व बाकीच्या प्रकरणांचा आणि त्यात येणाऱ्या विषयाचा आराखडा तयार करून तो इंदूरला पाठवून दिला !

पुढें दोन महिन्यांनीं, ता. ५ जानेवारी १९२५ रोजीं, इंदूरच्या 'महा-राष्ट्र साहित्य सभे'चे चिटणीस, श्री. वामन गंगाधर आपटे, याचं मला पत्र आल कीं, "तुम्ही पाठविलेल प्रकरण सर्वोत्कृष्ट ठरल्यावरून पाचशें रुपयांचें बक्षीस सभेनें तुम्हांस देऊं केलें आहे. आतां समग्र ग्रंथ पूर्ण कर-ण्याच्या उद्योगास तुम्हीं लागावें व ग्रंथ लिहून होताच इकडे सभेकडे पाठवावा."

'सुप्रजाजनशास्त्र' या ग्रंथाचीं एकंदर अठरा प्रकरणं मीं योजून

ठेवलीं होतीं. ती मी पुढें केव्हां लिहिलीं व कोणत्या मन:स्थितींत लिहिलीं त्या पुढच्या गोष्टी आहेत.

त्याच्या आधीं मध्यतरींच्या काळांतल्या माझ्या नागपूरच्या मुक्कामांतल्या कांहीं हकीगती सांगण्यासारख्या आहेत.

दिल्ली व सिंध हैदराबाद या दोन शहराशीं तुलना करतां नागपूर शहरांत सृष्टिसौंदर्याच्या दृष्टीनं माझं मन रमल नाहीं. शहराच्या पंचक्रोशींत आजूबाजूस प्रेक्षणीय म्हणून जीं ठिकाणं मला सांगण्यात आली तीसुद्धा नागपूरच्या लोकांनीं आपलेपणानं त्याचा अभिमान धरावा इतपतच रम्य असल्याचं मला आढळून आलं. प्रत्यक्ष शहराच्या रचनेंत तर ज्याला नयनरम्य ( Picturesque ) म्हणता येईल अस कांहीच नव्हतं. क्रॅडॉक टाउन, धनतोली इत्यादि शहराच्या नव्या विस्ताराची मांडणी मला डौलदार मुळींच वाटली नाहीं; आणि जुनं शहर तर अजून भोसल्याच्या काळातून डोळे चोळीत चोळीत उठतं आहे असच माझ्या मनात येई. लोक स्वभावानं मोठे दिलदार वाटत खरे, परंतु त्याच्या बोलण्याचालण्यांत राकटपणा आहेसं वारंवार वाटे. ज्या हिस्लॉप कॉलेजात मीं शिकवीत असे तें जुन्या शहराच्या ऐन प्रवेशद्वारापाशीं होत. कॉलेजची इमारत, वर्गातील फर्निचर इत्यादि गोष्टींकडे नजर टाकली, कीं एम्. ए. पर्यंतचे वर्ग ज्या ठिकाणीं आहेत अस हें नागपूरचं एक फार जुनं प्रसिद्ध कॉलेज आहे यावर विश्वासच बसण्यासारखा नव्हता. नागपूरच दुसरं मोठं कॉलेज म्हणजे मॉरिस कॉलेज. हें तर सरकारी होतं. परंतु एखाद्या मोठ्या. डाक बंगल्यासारखी वाटेल अशी त्या कॉलेजची इमारत होती. गांवांतले सामान्य लोक तर कॉलेजला कॉलेजहि म्हणत नसत. शाळा म्हणत. आणि कॉलेजांतल्या प्रोफेसराना सामान्य नागरिकाकडून आणि विद्यार्थ्यांकडूनहि 'मास्तऽर' म्हणून हाक मारण्यांत येई.

कोणत्याहि शहरीं नव्यानं गेलं कीं तिथें संगीताची विशेष आवड बाळगणारे कोण कोण लोक आहेत त्याची चौकशी करण्याचा माझा परिपाठ असे. दिल्लीच्या मुक्कामात मला आपली संगीताची आवड पुष्कळच भागवितां आली होती; आणि सिंध हैदराबादचा माझा मुक्काम जरी अगदीं अल्पावधीचा ठरला तरी तेवढ्यातहि सिंधी कवालीचं अस्सल रूप मला

अभ्यासायला मिळालं. नागपूरला मात्र गाण्यावाजविण्याची चर्चा व बैठकी ज्या मंडळींत विशेष चालतात अशी मडळी मला शोधूनहि आढळेनात. नाहीं म्हणायला गिरी नावाचे एक पोकी गृहस्थ मला आढळले. ( आतां नवयुग सिनेमानट झालेले) जोग यांचे बधु सारंगी चांगली वाजवीत असत. त्याचीहि पुढें थोडीशी ओळख झाली. आणि हिस्लॉप कॉलेजांतीलच एक प्रोफेसर पडित ( सारे लोक त्याना नानाजी म्हणत--पुढें ते इकडे फर्ग्युसन कॉलेजात आले ) हे सगीताचे बरेच भोक्ते होते. परंतु येवढी मडळी सोडली तर संगीताच्या दृष्टीन नागपूर शहर मला निर्जनच वाटलं.

परंतु या उणीवांची भरपाई करणाऱ्या इतर कित्येक गोष्टी मला आढळल्या. मला टेनिस भरपूर खेळायला मिळाल. हिस्लॉप कॉलेजचे प्रिन्सिपल गार्डिनर चांगलेच खेळत असत; व कॉलेजच्या वार्षिक टूर्नामेंट्समध्यें अध्यापक मडळींनीं हौसेनं भाग घ्यावा अशीं कॉलेजांतली प्रथा होती. आणि याहूनहि अधिक आनद देणारी गोष्ट मला आढळली ती अशी कीं कॉलेजच्या विद्यार्थ्यांपैकीं काहींच्या ठिकाणीं मराठी भाषेच्या व्यासंगाची विशेष आवड होती. हिस्लॉप कॉलेजमध्यें मराठी मंडळ तोंपर्यंत नव्हतं. उत्साही विद्यार्थ्यांच्या सहकार्यानं तें मी स्थापन केलं. 'महाराष्ट्र भाषा संवर्धक मंडळ' असं त्याला आम्हीं नाव दिलं, व मला वाटतं १९२४ च्या नोव्हेंबर महिन्यात त्या मंडळाच्या स्थापनेचा दिवस आम्हीं साजरा केला. मंडळ ताबडतोब लोकप्रिय झाल. प्रत्येक सभेला श्रोत्याची गर्दी होऊं लागली; आणि पुढें २३ जानेवारी १९२५ रोजीं आम्हीं गडकरी स्मृतिदिन साजरा केला तो तर इतका यशस्वी झाला कीं, हिस्लॉप कॉलेजात मराठीच्या समारंभाला येवढी प्रचड गर्दी लोटल्याचा तो पहिलाच दिवस होय असे उद्गार सर्वांनीं काढले.

कॉलेजच्या विद्यार्थ्यांचं मराठी कवितेच्या अभ्यासाकडे लक्ष वेधण्याचा एक मनोरंजक प्रयोग मला फार दिवस सुचलेला होता. क्रिकेट, टेनिस, इत्यादि खेळाचे जसे सामने होतात तसे कवितापाठाचे सामने कॉलेजच्या प्रौढ विद्यार्थ्यांत केले तर अत्यत श्रवणीय तर ठरतीलच, परतु शिवाय त्या निमित्तान विद्यार्थी मराठी कवितेचा सहजासहजीं अभ्यासहि करतील; लहान विद्यार्थी हा खेळ पुष्कळदा आपापसांत खेळतात. त्याला 'भंड्या' लावणं

म्हणतात. या खेळाचं. कॉलेजच्या विद्यार्थ्यांकडून पुनरुज्जीवन करायला काय हरकत आहे; असं माझ्या मनात कित्येक वर्षे घोळत होतं. माझी कल्पना विद्यार्थ्यांना सांगताच ती त्यांना इतकी आवडली कीं, अशा सामन्यांत पाळण्याचे नियम आम्ही विचारपूर्वक तयार केले, आणि थोड्याच दिवसात सामने घडवून देखील आणले. प्रथम हिस्लॉप कॉलेज-च्याच वर्गांचे प्रथमवर्ष संघ, द्वितीयवर्ष संघ, असे संघ तयार करून त्यांचे सामने करविले. ते इतके यशस्वी झाले कीं मॉरिस कॉलेजनहि ती कल्पना उचलली; व पुढं लवकरच मॉरिस कॉलेजचा संघ व आमच्या हिस्लॉप कॉलेजचा संघ अशा दोन संघांचा फार मोठा सामना झाला. तो ऐकायला दोन्ही कॉलेजांतील विद्यार्थ्यांची व जिज्ञासू नागरिकांची ही गर्दी झाली होती. या अत्यंत मनोरंजक अशा नव्या उपक्रमामुळें आमच्या 'महाराष्ट्र भाषासंवर्धक मंडळा' च नाव खूपच गाजल. या सामन्याची परंपरा नागपुरास अजूनहि चालू आहे कीं नाही मला माहीत नाही. परंतु आज बृहन्महाराष्ट्रातील शाळा–कॉलेजांतून मराठीच्या अध्ययनाकडे विद्यार्थ्यांचं जे विशेष लक्ष वळलेल आहे त्याला एक उपयुक्त दिशा लावायची असेल तर कविता–पाठांच्या चुरशीच्या सामन्याची माझी ही कल्पना अवश्य अमलात आणून पाहण्यासारखी आहे. या सामन्यासाठीं आम्ही तयार केलेले नियम बहुधा अजूनहि हिस्लॉप कॉलेजांतील 'महाराष्ट्र भाषा संवर्धक मंडळा' च्या दप्तरीं सांपडतील.

मध्यंतरी 'मानसोन्नति' ग्रंथाच लेखन मी चालू ठेवलंच होतं. मात्र तें आस्तेकदम चाललेलं होतं. कारण एक तर पूर्वी सांगितल्याप्रमाणें माझं चित्त त्यात विशेष रमलेल नव्हतं; आणि शिवाय त्यांत इतर लेखनाचे व्यत्यय येत होते. 'सुप्रजाजननशास्त्र' या ग्रंथाची हकीगत मी सांगितलीच आहे. परंतु त्याखेरीज आणखी एक पुस्तक तातडतोब लिहून देण्याच काम मला हातीं घ्यावं लागलं. हें पुस्तक म्हणजे इंटरमिजिएटच्या विद्यार्थ्यांसाठीं मी लिहिलेलं 'Manual of Logic' होय. कराचीचे एक सुविद्य प्रकाशक बी. जे. वास्वानी यानीं हें पुस्तक लिहिण्याची मला विनंति केली व आठशें रुपये मोबदला देऊं केला. त्यांची विनंति मान्य करून १९२४ सालच्या डिसेंबरपासून मी तें पुस्तक तयार करण्यांत गढून गेलों होतों.

अखंड काम करून दोन तीन महिन्यांत सबंध पुस्तक लिहून हातावेगळं करण्याची माझी इच्छा होती.

अशा प्रकारें अध्यापन, टेनिस, लेखन आणि महाराष्ट्र भाषासंवर्धक मंडळाचं विविध कार्य यात मी दंग झालेलों असतांना १९२५ सालच्या जानुआरी महिन्याच्या पहिल्या तारखेस मिसेस् मार्गरेट सॅंगर यांच्याकडून पुढीलप्रमाणें केबल आली.

" League cordially invites attendance Conference April New York. Hospitality expenses offered. "

मला टाऊक होतं कीं, सततिनियमनाच्या आतरराष्ट्रीय परिषदेची जिनीव्हाच्या बैठकीनंतर पुढची बैठक अमेरिकेत न्यू यॉर्क शहरीं व्हायची होती. जिनीव्हाच्या परिषदेत माझे दोन निबंध वाचले गेले ते सर्वांना अतिशय आवडले असहि परिषदेच्या वृत्तातावरून आणि मिसेस् मार्गरेट सॅंगर याच्या मध्यतरींच्या पत्रावरून मला कळलं होतं. परतु जिनीव्हाप्रमाणेंच न्यू यॉर्कलाहि येण्याबद्दल मला आमंत्रण येईल याची मला काहीच कल्पना नव्हती.

यामुळें मिसेस् सॅंगर याची ती केबल हातीं पडतांच मला आनंद तर झालाच परंतु त्याबरोबरच मी फिकिरींत पडलों.

कारण नागपूरच्या कॉलेजांतील कामावर मी येऊन रुजू झाल्याला नुकते कुठें तीन महिने पूर्ण झाले होते. अशा वेळीं माझं न्यू यॉर्कला जाणं जमणार कसं ?

म्हणजे चार महिन्यांपूर्वी मुंबईस असतांना जो पेच मला पडला होता तोच माझ्यापुढें पुन्हा उभा राहिला !

# १६

"संततिनियमनविषयक आतरराष्ट्रीय परिषदेच्या न्यू यॉर्क येथील बैठकीस हजर राहण्याचं निमत्रण मला तारेनं पाठवून मिसेस मार्गरेट सॅगर स्वस्थ राहिल्या नाहींत. मध्यंतरीं एका पत्रांत मी त्याना सहज लिहिलं होतं कीं, " केवळ एखाद्या परिषदेस हजर राहण्यासाठीं चार आठच दिवसापुरती युरपला अथवा अमेरिकेला मीं भेट द्यावी यांत मला काहीं स्वारस्य वाटत नाहीं. इतक्या दूर देशाला गेल्यावर तिकडे निदान सहा महिने तरी प्रवास करतां यावा व तिकडच्या परिस्थितीचं नीट निरीक्षण करता यावं अशी माझी इच्छा आहे; व कुणाचीहि मदत न मागतां मला असा प्रवास करतां आला तर हवा आहे. अमेरिकेंत व्याख्यानं देऊन पैसे मिळवितां येतात असं ऐकतों. मला तसं करतां येईल काय ? "

हा माझा प्रश्न मिसेस सॅगरनीं ध्यानात ठेवला असावा. कारण आमंत्रणाची तार केल्यानंतर त्यानीं लगोलग जे पत्र धाडलं त्यात पुढील मजकूर मुद्दाम लिहिला होता:—

" We are eager to have you at the Conference, and ask that you represent your country. We will make every

effort also to see if any one would be interested in having you give a series of lectures on birth control in all its aspects from the standpoint of India. "

आणि मिसेस सॅंगर यांनीं आपल्या स्नेही मंडळींत माझ्या व्याख्यानां-बद्दलची गोष्ट काढली असावी हें दर्शविणारं एक पत्रहि मला दहापंधरा दिवसांच्या अंतरानं आलं.

हें पत्र ' आयोवा स्टेट कॉलेज ऑफ ॲग्रिकल्चर ' या कॉलेजांतील ग्रामीण समाजशास्त्राचे मुख्य अध्यापक J. F. Thaden यानीं लिहिलं होत. मी न्यूयॉर्कच्या परिषदेला येणार म्हणून त्यानीं आनंद व्यक्त केला होता व म्हटल होत,

" I have a suggestion to offer you as regards a way of defraying your expenses. We have persons from European countries speak before the College students and public quite frequently, both at this College and at a large number of Colleges over the country. It may be that you could spend several weeks in this country after the Conference, and make addresses at about a dozen Colleges charging fifty or more Dollars for an address. "

अशा आश्वासनामुळें न्यूयॉर्कच्या परिषदेला गेल्यास एक वर्षभर अमेरिकेंत हिंडून येता येईल याबद्दल मला संशयाला जागाच उरली नाहीं. आणि मिसेस सॅंगर यांचं आमंत्रण स्वीकारण्याचा मला फार मोह वाटूं लागला.

परतु परिस्थितीनं मला चांगलाच पायबंद घातलेला होता. हिस्लॉप कॉलेजचे प्रिन्सिपल गार्डिनर यांजजवळ एक वर्षाच्या रजेची गोष्ट मीं सहज बोलता बोलता पर्यायानं काढून पाहिली; तेव्हां ते अगदीं आश्चर्याचा धक्का बसल्यासारखं करून म्हणाले, " वाहवा, हें चागल कीं ! आम्ही तर आतां तुमच्यावर अवलंबून आहोंत. आता लवकरच आमच्या कौन्सिलची वार्षिक सभा होईल त्या वेळीं तुम्हाला बढती देऊन कायम करण्याचा ठराव आम्ही करणार आहोंत. We can't spare you. " आणि

नागपूरची नोकरी सरळ सोडून देऊन अमेरिकेहून परत आल्यावर पुढचं पुढें पाहतां येईल असा विचार करण्याची मला सोय नव्हती !

अर्थात् अमेरिकेची सफर करण्याची सुवर्णसंधि चालून आली असतांहि मला तिचा आव्हेर करावा लागला !

या सर्व घडामोडी होत असतांना माझा लेखनाचा उद्योग चालूच होता. बरेच दिवस मागं पडलेली माझी पहिली कादंबरी 'कुलाब्याची दांडी' याच सुमारास प्रसिद्ध झाली होती; व तिच्यावर उलट सुलट अभिप्राय येऊं लागले होते. अगदीं काटेकोर अर्थानं 'अल्ला हो अकबर' ही माझी पुस्तकरूपानं प्रसिद्ध झालेली पहिली कादंबरी म्हणावी लागेल. परंतु कादंबरीलेखनाच्या ज्या तऱ्हेविषयीं पुढें माझं नांव प्रसिद्ध झालं त्या तऱ्हेचा प्रयोग 'कुलाब्याच्या दांडी'मध्यें मीं प्रथम करून पाहिला. या दृष्टीनं ही कादंबरी माझी खरी पहिली कादंबरी होय असं ज्याप्रमाणं मी मानतों, त्याप्रमाणेंच विरोधकांच्या टीकेचा हल्ला माझ्यावर ज्यामुळें झाला असं माझं पहिलं पुस्तक कोणतं असं कुणी विचारलं तर 'कुलाब्याची दांडी' हेंच नाव मला घ्याव लागेल. यापूर्वीची माझीं सारीं पुस्तकं सर्वप्रिय आणि सर्वमान्य ठरलीं होतीं. त्यावर सर्व वृत्तपत्रांत अनुकूलच अभिप्राय आले होते. परंतु या माझ्या नव्या कादंबरीनं विरोधाच्या गांधिलमाशा कांहीं ठिकाणीं उठल्या. 'ज्याचा हेवा दावा वाटावा इतका मोठा लेखक झाल्या-वांचून त्याचे टीकाकार उत्पन्न होत नाहींत' हें सुभाषित लक्षांत घेतां असच म्हटल पाहिजे, कीं 'कुलाब्याची दांडी' प्रसिद्ध होतांच माझी लोक-प्रियता उत्तरोत्तर वाढणार अशी भीति कांहीं लोकाना वाटली असली पाहिजे, व त्यानींच त्या कादंबरीवर टीकेचं हत्यार उपसलं असलं पाहिजे. गेलीं जवळजवळ वीस वर्षे साहित्यक्षेत्रांतल्या 'टीका' नावाच्या पदार्थाच्या सर्व जातीचा परिचय मला झालेला आहे. त्याचे पौष्टिक व विषारी दोन्ही मासले माझ्या पचनीं पडले आहेत. परंतु 'कुलाब्याची दांडी' प्रसिद्ध झाली त्या वेळीं टीकेचा—विशेषतः दुष्ट बुद्धीनें केलेल्या निंदेचा मला प्रथमच अनुभव आला, व तशी टीका माझ्या मनाला बोचल्यावाचून राहिली नाही.

एकदर मराठी भाषाशैलीला व विशेषतः कादंबरीलेखनाला कोणत्या

तऱ्हेच आधुनिक वळण देण्याचा हेतु 'कुलाब्याची दांडी' लिहिताना मी मनात ठेवला होता तें मीं मागं सांगितलच आहे. तो हेतु साध्य करण्या-साठीं विशेष श्रम करून मीं ती कादबरी लिहिली असल्यामुळें मराठी वाचकाच्या मनावर तिची पकड ताबडतोब बसली, आणि अगदीं नव्या धर्तीची व अत्यंत चित्ताकर्षक शैलीनें लिहिलेली पहिली मराठी कादंबरी असाच तिच्याबद्दलचा निर्णय वृत्तपत्रांनीं दिला.

या निर्णयाला गालबोट लावणारे दोन अभिप्राय ठरले. एक 'केसरी'चा व दुसरा 'ज्ञानप्रकाश'चा. पैकीं 'केसरी'नें कादंबरी अत्यत चित्ताकर्षक असल्याचं कबूल केल होतं. परंतु 'कांहीं प्रसंग इंग्रजीवरून घेतल्यासारखे वाटतात' असा खवचट मोघम शेरा मारला होता. मी व 'केसरी' सस्था यांमध्यें आजहि प्रेम कांहीं मोठं साडून वायां जात नाहीं, आणि त्यामुळें माझ्या पुस्तकाची तारीफ स्वतःची लाज राखण्यापुरती करतांना ती कुंथूनच करण्याची परंपरा 'केसरीं'त अजूनहि चाललेली दिसते. त्या वेळीं तर काय 'केसरी'च्या दृष्टीनं मी गुन्हेगारच होतों. तेव्हा माझ्या कादंबरीला चागलं म्हणतां म्हणता 'केसरी'नं नाक मुरडल याचं मला आश्चर्य वाटलं नाही. आणि तस म्हटलं तर 'केसरीं'तला अभिप्राय कुत्सित असला तरी सविस्तरहि नव्हता आणि जळजळीतहि नव्हता.

असला अभिप्राय देण्याचा पराक्रम 'ज्ञानप्रकाश'नं केला.

'ज्ञानप्रकाशा'तील टीकेचा रोख असा होता कीं पुण्यातील एका प्रसिद्ध सुधारक वकिलाच्या तरुण मुलीच चित्र पुढें ठेवून मी 'कुलाब्याच्या दांडीं'तील माणिक ही नायिका रंगविली असून बाळासाहेब आणि आबासाहेब या दोन गौण पुरुष पात्राची सजावटहि पुण्यातल्या दोन (कुप्रसिद्ध) व्यक्तींवरून मी केली असली पाहिजे. 'ज्ञानप्रकाश'च्या दृष्टीला ज्या या व्यक्ती माझ्या कादंबरींत दिसल्या त्याचा मवाळ राजकारणाशीं थोडा फार सबंध असल्या-मुळें, व त्या व्यक्तींचा व 'ज्ञानप्रकाश'चे त्या वेळचे संपादक कै. आबेकर यांचा खासगी स्नेहसबंध असल्यामुळें त्या व्यक्तींचीं प्रतिबिंबे माझ्या कादं-बरींत दिसल्याचा भास झाल्याबरोबर त्यांनीं माझ्याविरुद्ध मोठीच आरोळी ठोकली. कादंबरी सदभिरुचीला विघातक आहे अस विधान करण्यापर्यंत त्यांची मजल गेली.

'ज्ञानप्रकाशां'त हा अभिप्राय प्रसिद्ध झाल्याबरोबर माझे प्रकाशक श्रीयुत गोखले यानीं तो अंक माझ्याकडे पाठवून दिला. त्यातली टीका वाचल्यावर प्रथम कांहीं वेळ मला तीव्र संताप आला. कारण 'ज्ञानप्रकाश'च्या म्हणण्यांत यत्किंचित्‌हि सत्यांश नव्हता. ज्या वकिलांच्या मुलीचं चित्र मी रंगविल्याचा 'ज्ञानप्रकाश'काराना भास झाला होता त्याची तर मला ऐकूनहि नीटशी माहिती नव्हती. टीका वाचल्यावर मग चौकशी करून मला ती मिळवावी लागली. वस्तुस्थिति अशी असल्यामुळें 'ज्ञानप्रकाश'च्या त्या कुभांडाचा मला फार राग आला. अभिप्रायांत सदभिरुचीचा प्रश्न उपस्थित केला गेला होता हें पाहून असहि वाटलं कीं, 'ज्ञानप्रकाश'कारानीं सदभिरुचीचा प्रतिपाळ केव्हां किती केला त्याचा गेल्या पाचदहा वर्षांतला इतिहास लोकापुढें मांडावा. परंतु अधिक विचार केल्यावर वाटूं लागलं कीं, 'ज्ञानप्रकाश'मधील त्या टीकेला इतकं महत्त्व देण्यात कांहीं अर्थ नाहीं. राजकीय मतांच्या भिन्नत्वामुळें 'ज्ञानप्रकाश'च्या तोंडून माझ्याविषयींच्या स्तुतीपेक्षा निंदेचे उद्गार निघणं अधिक सहज शक्य असावं ही गोष्ट सामान्य वाचकांनादेखील माहीत होती, व त्यामुळं सदभिरुचीच नाव घेऊन केलेल्या त्यातल्या टीकेमागं खरोखर कोणता हेतु आहे तें त्याना सहज ओळखता येण्यासारखं होतं. मुख्यतः याच विचारानं त्या टीकेकडे दुर्लक्ष करण्याच मीं ठरविलं.

मात्र येवढं खरं कीं, त्या वेळपर्यंत साहित्यसेवेचा मोबदला पुच्छगुच्छांच्या रूपानच मिळतो अशी माझी मुग्ध समजूत पहिल्या पाचसहा पुस्तकाच्या अनुभवानं झाली होती, तिचा प्रथमच भंग झाला. मत्सर, असूया व हेवेदावे कुठे कुठे लपून बसले असतील याचा नियम नाहीं व त्यांजकडून विटादगडाचा माराहि कसा होईल हें सागता येणार नाहीं, असा साहित्यसेवेच्या क्षेत्रांत मोठेपणा मिळवूं पाहणाऱ्यानं मनाशीं हिशेब ठेवला पाहिजे, ही गोष्ट मीं प्रथम शिकलों. साहित्यसेवेबाबत जी मुग्ध वृत्ति आजपर्यंत माझ्या ठिकाणीं होती ती सोडली पाहिजे. साहित्यसेवा—विशेषतः त्या क्षेत्रात उच्चस्थान मिळविण्यासाठीं होणारा प्रयत्न म्हणजे एक चांगलाच धकाधकीचा मामला होय हें माझ्या ध्यानांत आलं.

साहित्यिक जीवनाच्या दृष्टीन सन १९१२ च्या फेब्रुआरी महिन्यांत

माझा जन्म झाला हें ज्या न्यायानं मीं अगदीं प्रारंभीं म्हटलं त्याच न्यायानं असं म्हटलं पाहिजे कीं, १९२५ च्या (योगायोग असा कीं, फेब्रुआरी महिन्यांतच) साहित्यिक जीवनाच्या दृष्टीनं मी सज्ञान झालों. साहित्यिक जग दुरून कितीहि रम्य आणि सोज्वळ वाटलं तरी त्यांतला प्रत्यक्ष व्यवहार निरपवाद रीतीनं निर्मळ नसतो; हेवेदावे, खासगी गाऱ्हाणीं, संकुचित व दुष्ट बुद्धीनं मांडलेली वैरं आणि घेतलेले सूड इत्यादींचा साहित्यमापनावर परिणाम झाल्यावाचून राहात नाहीं; आणि खऱ्या साहित्यिकानं या सर्व पिशाच्चांना तोंड देऊनच आपला मार्ग काढला पाहिजे हें साहित्यसेवेंतलं मोठ्या महत्त्वाचं व्यवहारी ज्ञान मला त्या वेळीं प्रथम झालं. या दृष्टीनं 'कुलाब्याची दांडी' म्हणजे माझ्या साहित्यजीवनातला एक महत्त्वाचा टप्पा मी समजतो.

'सुप्रजाजनशास्त्रा'वरील निबंधाचं बक्षीस मला मिळाल्यापासून तो निबंध पुढें लिहिण्याच्या उद्योगाला मी लागलो होतों. मार्च महिन्याच्या मध्यापर्यंत त्याचीं सात प्रकरणं मी लिहून तयार केली होतीं. कॉलेजला मिळणारी उन्हाळ्याची मोठी सुटी आता एका महिन्यावर आली होती, व मी साहजिकच मनाशीं म्हणत होतों कीं, या अडीच तीन महिन्याच्या सुटींत जो निवान्तपणा मिळेल त्यात हें मोठं काम आपल्याला सहज पूर्ण करता येईल. माझ्या मनातला उत्साह वाढविणाऱ्या गोष्टीहि घडत होत्या. त्यातली प्रमुख गोष्ट ही कीं, हिस्लॉप कॉलेजच्या अधिकाऱ्यांनीं माझा पगार वाढवून मला कायम केल्याचा ठराव माझ्या हातीं पडला होता. म्हणजे नोकरीच्या बाबतींत मी आता निश्चित झालों होतों. नागपूर हेंच आतां माझ्या पुढील आयुष्याचं व साहित्यिक चळवळीचं केंद्र ठरलं असं मीं मानूं लागलो होतों, व नागपूरकरहि मला आपला समजूं लागले होते.

परंतु मला नोकरीवर कायम केल्याचा ठराव ज्या दिवशीं माझ्या हातीं पडला तेव्हांपासून पुरते दहा दिवसहि लोटले नाहींत तोंच मला नागपूर सोडावं लागणार अशीं चिन्हं दिसूं लागलीं. स्वमताचा आग्रह धरायचा कीं नोकरी सांभाळायची असा प्रश्न एकाएकीं माझ्यापुढें उभा राहिला!

# १७

सुमारें ता. १३ मार्च १९२५ रोजीं हिस्लॉप कॉलेजांतील जागेवर मला कायम करण्यात आल्याच मला कळलं.

आणि हिस्लॉप कॉलेजांतील नोकरी सोडण्याची वेळ कदाचित् माझ्यावर येईल असं सुचविणारी पहिली गोष्ट ता. २० मार्च रोजीं घडली !

कॉलेजात पहिला तास आटपून मी विश्रांति घेत असताना प्रिन्सिपल गार्डिनर याची चिठी शिपायानं मला आणून दिली. चिठींत लिहिलं होत, " काम आटपून घरीं जाण्यापूर्वी माझी भेट घ्याल काय ? काहीं महत्त्वाचं काम आहे. "

त्या चिठीप्रमाणें बी. ए. चा तास घेतल्यानंतर मी गार्डिनर यांच्याकडे गेलों. त्याची नेहमींची बसायची जागा कॉलेजच्या दारांतून आंत शिरताच डाव्या हातच्या पडवीवजा खोलीत उघड्यावरच होती. तिऱ्हाईत माणसाला तर त्या जागेतलं कारकुनाचं टेबल कोणतं आणि प्रिन्सिपालचं टेबल कोणतं तेंसुद्धा साहेबाला प्रत्यक्ष खुर्चीत बसलेला पाहिल्याशिवाय सांगता येऊं नये अशी तिथली चमत्कारिक व्यवस्था होती. मिशनरी साधेपणाचा हा भाग

म्हणावयाचा, कीं कचेरींतल्या कारकुनावर अगदीं सक्त देखरेख ठेवण्याचा हा धूर्त कावा म्हणायचा असा प्रश्न त्या जागीं ज्या ज्या वेळीं जाव त्या त्या वेळीं माझ्या मनात येई; आणि अगदीं अखेरपर्यंत त्या प्रश्नाचं उत्तर मला ठरवितां आल नाही. प्रोफेसरापैकीं प्रिन्सिपलची भेट घ्यायला कुणी गेलं, कीं तिथें उघड्यावर आणि कारकून मंडळींसमोरच त्यानं प्रिन्सिपलशीं काय बोलणं करायचं आहे तें करायच अशी विचित्र पद्धत असे.

त्या दिवशीं मात्र मी गेल्याबरोबर गार्डिनर म्हणाले, "आपण जरा लायब्ररींत जाऊ या. तिथेंच बोलू."

लायब्ररींत गेल्यावर उभ्याउभ्याच अगदीं गंभीर चेहरा करून त्यांनीं मला विचारलं, "फडके, तुम्हीं Birth Control नांवाचं एक पुस्तक लिहिलं आहे काय ?"

तो प्रश्न विचारतांना त्यांनीं इतका चिंतातुर चेहरा का करावा तें माझ्या लक्षांत येईना. मीं म्हटलं, "होय, लिहिल आहे."

"त्या पुस्तकांत तुम्हीं कोणतीं मतं प्रतिपादिली आहेत ?"

मीं लगेच उत्तर दिलं, "हिंदुस्थानातील विवाहित स्त्रीपुरुषानीं संततिनियमन केलं पाहिजे; आणि तें करायचं असेल तर कृत्रिम गर्भप्रतिबंधक साधनं वापरणं हाच सर्वात खात्रीचा उपाय असून, त्याचा अवलंब करण्यांत कोणत्याहि प्रकारची अनीति नाहीं."

तें ऐकून गार्डिनर क्षणभर माझ्याकडे पाहतच राहिले व मग मान हलवून आणि चक्-चक् असा जिभेनं आवाज करून म्हणाले, "हीं मतं भयंकर स्वरूपाचीं आहेत असं नाहीं तुम्हांला वाटत ?"

मीं मान हलवून म्हटलं, "उलट या मताचा प्रसार अतिशय कसोशीनं आमच्या देशांत झाला पाहिजे अशी माझी समजूत आहे."

डोळे किंचित् किलकिले करून त्यांनीं विचारल, "पण सोईसाठीं ही मतं सोडायला तुम्ही तयार नाहीं होणार ?"

त्याच्या प्रश्नाचा अर्थच मला कळला नाही व मीं त्याना तसंच सांगितलं.

मग ते म्हणाले, "थोडी हकीगत झाली आहे ती ऐका."

त्याच्या हकीगतीचा सारांश असा होता की, दोन दिवसांपूर्वीच माझं Birth Control हें पुस्तक त्याच्या व कौन्सिलच्या आणखी एक दोन

सभासदाच्या निदर्शनास आणण्यांत आलं होतं. इंग्लंड अमेरिकेंतहि संतति-नियमनाच्या प्रश्नाला मिशनरी लोकाचा अगदीं कसून विरोध असल्यामुळें व हिस्लॉप कॉलेज मिशनरी संस्थेनं चालविलं असल्यामुळें सततिनियमनाचा पुरस्कार करणारा माझ्यासारखा मनुष्य त्यांना नोकरीवर ठेवणं तत्त्वतः शक्य नव्हत. अर्थात् माझी बोळवण करण्याची चर्चा त्या मंडळींत चालू होती व ती माझ्या कानावर घालण्यासाठींच गार्डिनरन मला बोलाविलेलं होतं.

सारी हकीगत सागून झाल्यावर गार्डिनरनं माझ्याकडे दृष्टि लावून विचारलं, " आलं लक्षांत सारं तुमच्या ? आता काय करायच ? "

मीं उलट विचारलं, " कुणी ? "

त्यांनीं किंचित् हसून म्हटलं, " आम्हीं, आणि तुम्हीं ? "

मींहि हसून उत्तर दिलं, " दोघानीहि काय करायच ते उघड आहे. मीं राजीनामा द्यायचा आणि तुम्ही तो मंजूर करायचा. "

घोटाळलेल्या मनःस्थितींत असतांना जीभ बाहेर काढून तिचं टोक वरच्या ओठावर फिरविण्याची गार्डीनरची लकब पूर्वी माझ्या ध्यानांत आली होती; परतु त्या वेळीं त्याच्या त्या चाळ्याकडे माझ विशेष लक्ष गेल. माझ्या मनात क्षणार्धात असंहि आल, कीं एकीकडे मनस्ताप सहन करीत असताना दुसऱ्या माणसाच्या हास्यास्पद खोड्यानीं मनाची करमणूक व्हावी हा काय चमत्कार !

त्या वेळचा माझा हा आत्मगत विचार मला आजहि नक्की आठवतो. याचं कारण हें कीं पुढें कथालेखनामध्यें माझ्या त्या अनुभवाचा मीं कित्येक वेळां उपयोग केला आहे. बाह्य जगाच आणि इतरांच्या वागणुकीचं सूक्ष्म अवलोकन जितकं लेखकाला उपयोगीं पडत तितकंच वेगवेगळ्या सुखदुःखाच्या प्रसगीं स्वतःच्या मनोव्यापाराचं अवलोकन त्याला उपयुक्त ठरत. आणि अवलोकनाचा हा विषय त्याला अगदीं जवळचा असल्यामुळें त्या अभ्यासाला कधीं खंड पडायचं कारणच नाहीं.

मी वास्तविक गार्डिनरच्या जिभेचा विचित्र चाळा मनाशीं नोंदून ठेवीत होतों. परतु गार्डिनरला साहजिकच वाटलं कीं, मी मनाशीं गंभीर विचार करीत असेन. ते म्हणाले,

" राजीनाम्याची गोष्ट तुम्हाला जितकी उघड वाटते तितकी मला

वाटत नाहीं. यांतून दुसरा मार्ग निघण्यासारखा आहे. तुमच्या शिकवण्या-वर विद्यार्थी किती खूष आहेत तें मला व आमच्या कौन्सिलमधील इतरांनाहि माहीत आहे. तुम्हांला कायम करण्याचा ठराव आम्हीं नुकताच केला तो अगदीं एकमतानं. तुम्हीं आम्हाला सोडून जाव हें आम्हाला कोणालाच आवडण्यासारखं नाही."

"तस असेल तर मग माझ्या पुस्तकाचा प्रश्नच उद्भवतो कसा?"

"उद्भवतो; त्याला इलाज नाही. आमच्या मिशनचीं मतं अगदीं कडक आहेत व कॉलेजातल्या कोणत्याहिं गोष्टीचा त्या मताशीं विरोध आलेला चालायचा नाही.

मीं म्हटल, "ठीक आहे. मिशनचीं मतं सुखरूप असोत, मी राजीनामा द्यायला तयार आहे."

गार्डिनरनं चटकन् आपला उजवा हात माझ्या खांद्यावर टाकला व म्हटलं,

"No, no असा एकदम निकाल लावूं नका. मिशनला आपली भूमिका बदलायला लावण मला शक्य नाहीं. परंतु तुम्हांला जरा निराळ्या रीतीनं विचार करा म्हणण मला शक्य आहे. म्हणूनच तुमच्याशीं प्रिन्सि-पल या नात्यानं नव्हे तर तुमचा चाहता व हितकर्ता म्हणून हें बोलत आहे. I can undesrtand what it is to be young. But don't be impetuous. 'बर्थ कन्ट्रोल' या पुस्तकात प्रतिपादिलेलीं माझीं मतं आता बदललीं आहेत असं लोकात तुमच हसं होणार नाहीं अशा रीतीनं कॉलेजच्या अधिकाऱ्यांना सागणं अशक्य आहे काय? मला नाहीं वाटत."

ते काय सुचवीत होते तें माझ्या लक्षात सहज आलं. मीं म्हटलं,

"तुम्ही हें सारं सद्बुद्धीनं बोलतां आहांत हें मला मान्य आहे, आणि त्याबद्दल मी तुमचे आभार मानतों. परंतु संततिनियमनाबद्दलचीं माझी मतं बरोबर आहेत व कायम आहेत, आणि कोणत्याहि आपत्तीला भिऊन सोईसाठीं मतांतर करायला मी तयार नाही."

"मग माझा नाइलाज आहे तर!" अस गार्डिनर म्हणाले व आमची ती मुलाखत संपली.

मला हिस्लॉप कॉलेज सोडून जावं लागत आहे या बातमीनं साहजिकच

विद्यार्थिवर्गात आणि प्रतिष्ठित नागरिकांपैकीं जे माझे मित्र व चाहते झाले होते त्याच्यात मोठीच खळबळ उडाली. ज्याला ज्याला म्हणून मी जाणार अशी बातमी कर्णोपकर्णी कळली त्यानें माझ्या भेटीला यावं, हें आहे काय म्हणून विचारावं, अन् प्रत्येकाजवळ झाल्या प्रकाराचा सबंध पाढा मीं वाचावा असा प्रकार सुरू झाला. हिस्लॉप कॉलेजची नोकरी सोडल्यावर मी नागपुरास राहणार नाहीं हें उघड होतं, आणि त्याचा सर्वांना खेद होत होता. कॉलेजांतली नोकरी गेली तरी मला ज्यायोगे नागपुरास राहतां येईल अशा योजना माझ्यापुढें माडण्यात येऊं लागल्या. परतु मला त्या पटेनात. हिस्लॉप कॉलेजच्या चालकांविषयीं गांवांत फारस अनुकूल मत नव्हतंच. त्यामुळें मला नोकरीवर कायम केल्याचा ठराव केल्यानतर त्यानीं मला जायला सांगावं या गोष्टीची सगळ्यानाच फार चीड आली, व या अन्यायाबद्दल त्यांना शासन दिलं पाहिजे असाहि विचार निघाला. काहीं स्थानिक नामांकित वकिलांनीं मला सल्ला दिला कीं, कराराचा भंग केल्याबद्दल हिस्लॉप कॉलेजवर मी फिर्याद केल्यास खटल्याचा निकाल खचित माझ्या बाजूचा होईल व मला नुकसानभरपाई मिळेल.

परतु अशा मसलती ऐकण्याच्या मनःस्थितींत मी स्वतः नव्हतों.

ता. २७ मार्च १९२५ रोजीं मीं कॉलेजच्या नोकरीचा राजीनामा सादर केला आणि त्या विचित्र प्रकरणातून मीं मनानं मुक्त झालों. मनानं मुक्त झालों असं मुद्दामच म्हणतों. कारण मीं जरी राजीनामा दिला तरी आणखी थोडे दिवस प्रत्यक्ष कॉलेजच्या कामांतून माझी मुक्तता होणार नव्हती. एप्रिल महिन्याच्या १३ तारखेस कॉलेजच्या कामाच वर्ष सपून वर्षाखेरची मोठी सुटी सुरू व्हावयाची होती, व त्या तारखेपर्यंत कॉलेजचं सारं रीतसर काम मीं करावं व पगार घ्यावा असं प्रिन्सिपल गार्डिनरचं म्हणणं होतं. ही गोष्ट त्यानं मला सुचविली तेव्हा मीं म्हटलं,

"म्हणजे सततिनियमनविषयक माझीं जीं मतं तुम्हांला भयंकर वाटतात त्याचा या पंधरा दिवसांत काहीं उपद्रव होणार नाही अशी तुमची खात्री आहे म्हणायची?"

माझ्या या कडवट बोलण्यांतला विनोद तेवढा विचारांत घेऊन गार्डिनर हसले व म्हणाले,

" Yes. I hope we shall all be safe in spite of your being with us ! And Mr. Phadke, let me repeat, don't misunderstand. We have to part. But we part as friends. "

हे उद्‌गार त्यानीं अंतःकरणपूर्वक काढले असावेत. कारण त्यांनीं मला जायच्या वेळीं अतिशय चांगलं प्रशस्तिपत्र दिलं, आणि पुढें जवळजवळ दोन वर्षांनंतर जेव्हा त्यांची व माझी अकस्मात् एकदा गांठ पडली तेव्हाहि ते माझ्याशीं फार सौजन्यानं वागले.

मला वाटतं १९२७ सालच्या उन्हाळ्यांतली ती गोष्ट असावी. मी महाबळेश्वरास गेलों होतो व एके दिवशीं संध्याकाळीं हिंडताहिंडता 'गॉल्फ लिंक्स' कडे वळलो. सूर्यास्त होऊन गेला होता आणि अंधार पडूं लागला होता. समोरून एक इंग्रज जोडपं येत आहेसं मला वाटलं. तीं दोघं माझ्या अगदीं जवळ आली तेव्हां मला एकदम ओळख पटली व मीं थबकून विचारलं,

" Is that Mr. Gardiner by any chance ? "

त्यांनीं माझ्याकडे पाहताच हास्य केलं व म्हटलं,

" Yes, by every chance, Mr. Phadke. How are you ! "

हस्तादोलन करतांकरतां मीं त्याना विचारलं,

" What brings you to this hill station of ours instead of Pachmari ? "

" Rather ask who. And the answer would be Mrs. Gardiner. "

यावर आम्ही तिघंहि हसलों आणि मग बराच वेळ एकत्र सहल केली.

दुसऱ्या दिवशीं त्याच्या बोलावण्यावरून त्याच्या हॉटेलांत मी त्यांना भेटायला गेलो तेव्हाहि आमचं पुष्कळ मनमोकळ बोलणं झालं. कोल्हापूरच्या कॉलेजात मी असून माझं चागलं चाललं आहे हें ऐकून ते म्हणाले,

" O, I knew you would always thrive. "

कांहीं वेळानं त्यांनीं किंचित् चेष्टेनं प्रश्न केला, " आणि तुमच्या संततिनियमनविषयक मतांचं कसं काय ? "

मीं चटकन उत्तर दिलं, They too are thriving. "

ते हसले.

त्याना खिजवावयाची इच्छा मला आवरतां आली नाहीं; अन् मीं त्यांना सांगितल,

" तीस चाळीस पानांच्या एका चोपड्यासाठीं तुम्हीं मला Dangerous ( भयंकर ) मनुष्य ठरवलत. आतां तर मी फारच Dangerous झालो आहे. संततिनियमनाच्या विषयावर ' Sex Problem in India ' नावाचा एक मोठा ग्रंथ मीं लिहिला आहे. देशी-विदेशी सर्व वृत्तपत्रानीं त्यावर उत्तम अभिप्राय दिले आहेत. इतकच नव्हे तर जपानमधें आणि अमेरिकेंतल्या काहीं संस्थानात माझ्या पुस्तकाला बंदी करण्यांत आल्यामुळें मी आतां अगदीं पुरता मोठा मनुष्य झालों आहे. "

गार्डिनर हसले व म्हणाले, " तुम्ही अगदीं घातुक मतांचा प्रसार करीत आहांत असं तर मला म्हटलंच पाहिजे. परंतु तुमची कीर्ति वाढत आहे व आयुष्यांत तुम्ही स्थिर होत आहात या गोष्टीचा मला आनंदच होतों. "

ही हकीगत या ठिकाणीं इतकंच स्पष्ट करण्यासाठीं सांगितली, कीं मला नोकरीचा राजीनामा द्यावयास लावणं जरी गार्डिनरला भाग पडलं होतं तरी त्यानं व्यक्तिशः माझ्याविषयीं सहानुभूति आणि सौजन्यच दाखवलं; म्हणून राजीनामा सादर केल्यानंतरहि पधरा दिवस कॉलेजात काम करीत राहण्याची त्याची सूचना मीं स्वीकारली.

हे पंधरा दिवस मीं मोठ्या विचित्र मनःस्थितींत घालविले असते तर ते साहजिकच म्हणावं लागलं असतं. परंतु झालं मात्र निराळं. या नव्या आपत्तीनं मी दडपूनहि गेलों नाहीं किंवा चिडलोहि नाहीं. सात आठ महिन्याच्या करारानं हिस्लॉप कॉलेजातील नोकरीवर मी आलों असतों तर करार संपून जातांना माझी जी मनःस्थिति झाली असती तीच आतांहि झाली होती. याचं एक कारण कदाचित् हें असेल, कीं बरोबर अशीच विचित्र आपत्ति पूर्वी एकदा माझ्यावर येऊन गेली होती व त्यामुळें या प्रकारानं बावरून जाण्याइतका मी कच्च्या मनाचा राहिलों नव्हतों. तें कसहि असो, नागपूरच्या मुक्कामाचे उरलेले पंधरा दिवस मीं फार मजेंत काढले येवढं खरं. आतां माझा सहवास पंधराच दिवस काय तो मिळणार

या भावनेनंच कीं काय कुणास ठाऊक, पण गेल्या सातआठ ।महिन्यांत नागपूरची जी पांचसहा मडळी माझ्या विशेष परिचयाची झाली असूनहि दूर राहिली होती, ती माझ्या अधिक जवळ आली. त्याच्याशीं खप गप्पा-गोष्टी कराव्या, अगदीं मनस्वी थकवा येईपर्यंत टेनिस खेळावं, तेलगखेडी, रामटेक अशा जवळच्या व दूरच्या ठिकाणीं सफर करावी, खूप वाचावं आणि सपाटून लिहावं—असा त्या पंधरा दिवसांत माझा क्रम होता. टॉमस हार्डीची 'Jude, the obscure,' व टॉलस्टॉयची 'Anna Karenina' या दोन कादंबऱ्या मीं अभ्यासपूर्वक वाचून काढल्या, आणि मुख्य म्हणजे सुप्रजाजननशास्त्रावरील माझ्या निबंधाचीं आठ ते चौदा अशीं सात प्रकरण मीं त्या दोन आठवड्यात लिहून काढलीं. "It is only necessary to forger onself to be at peace and happy" ॲना करेनिना' मधलं टॉलस्टॉयच वाक्य माझ्या पुरतं अनुभवाला आलं. साहित्याचा विलक्षण छद ज्या माणसाला असेल त्याला ससारातल्या लहान-मोठ्या सुखदुःखावर जय मिळविता येतो याचा मला अनेक वेळा अनुभव आलेला आहे. अशा वेळापैकींच ती एक वेळ होती.

माझे अखेरचे पंधरा दिवस केव्हांच निघून गेले व ता. १३ एप्रिल १९२५ रोजीं दुपारीं मी मुंबईच्या गाडींत बसलों. माझे विद्यार्थी व गांवां-तील कित्येक मंडळी मला निरोप देण्यासाठीं स्टेशनवर आली होती. त्यांनीं माझ्या गळयांत हार घातले, गाडी चालू झाली, त्या मंडळींचे 'Good-bye' 'Good-bye' हे शब्द कानावर पडत असताच त्यांच्या आकृती दिसेनाशा झाल्या, व मग खिडकींतून मागं सरकून आपल्या जागे-वर मीं बसलो, आणि त्याबरोबर ज्या प्रश्नाचा गेल्या पंधरा दिवसांत यत्किंचितहि विचार करण्यास मीं स्वतःला सवडच दिली नव्हती तो प्रश्न माझ्या मनासमोर उभा राहिला—

" पुढें काय ? "

# १८

नागपूरहून परतण्याच्या वेळीं दोन ग्रंथाचीं हस्तलिखितं माझ्याजवळ अपुऱ्या स्थितींत होतीं. एक इंदूरचं बक्षिस ज्यासाठीं मला मिळालं तो सुप्रजाजनशास्त्रावरीस प्रबंध, आणि दुसरा डॉ. गणपुले यांच्यासाठीं लिहिण्यास घेतलेला 'मानसोन्नति' हा ग्रंथ. हे दोन्ही आतां झपाट्यानं पुरे करायचं मीं ठरविलं. सुप्रजाजनशास्त्राचा अगदीं प्रकरणवार आराखडा माझ्याजवळ तयारच होता. त्यामुळे उरलेलीं प्रकरणं मी अगदीं भराभर लिहून काढली आणि नागपूरहून परतल्यापासून एक महिन्याच्या आतच सबंध हस्तलिखित मी इंदूरला रवाना केलं.

हा माझा प्रबंध इंदूरची 'महाराष्ट्र साहित्य-सभा' छापून प्रसिद्ध करील अशी माझी अपेक्षा होती. परंतु त्यात अडचणी येऊं लागल्या, तेव्हां पुढें दोन वर्षांनंतर या प्रबंधातील सुमारें तीन-चतुर्थांश भाग 'सुखाचे संसार' या नावानं गोखले यांच्या विजय साहित्य-संस्थेंतील एक पुस्तक म्हणून प्रसिद्ध करण्यात आलं.

परंतु त्याच्या आधींच दुसरी एक संधि मला मिळाली. 'Birth

Control' या नांवाचं माझं लहान पुस्तक मुंबईच्या तारापोरवाला अॅन्ड सन्स या कंपनीकडे विक्रीला असे. त्या पुस्तकाचे हिशोब घेण्यासाठीं मी तेथें मधून मधून जात असे. हळूहळू कंपनीचे प्रमुख चालक विकाजी तारापोरवाला यांचा व माझा परिचय होत गेला. मराठी साहित्यक्षेत्रांत माझं स्थान कोणतं होत तें त्यांच्या कानीं गेलं असावं, आणि माझं इंग्रजी लेखनहि त्यांच्या नजरेस पडलं असावं. एकदा बोलता बोलता त्यांनीं मला विचारलं,

"फडके, आमची ही कंपनी केवळ पुस्तकं विकणारी नाहीं, आम्ही प्रकाशनाचा धंदाहि करतो हें तुम्हांला माहीत आहे ?"

मी म्हटलं, "हो, मला माहीत आहे."

"मग तुम्ही आमच्यासाठीं एखादं इंग्रजी पुस्तक कां लिहीत नाहीं ?"

इंदूरच्या निबंधाचा विषय माझ्या डोक्यात होता. त्या विषयावर हिंदुस्थानांतील परिस्थितीच्या दृष्टीनं हिंदी माणसानं लिहिलेलं पुस्तक अजून नव्हतं. तेव्हां त्यावर मीं इंग्रजी पुस्तक लिहून दिलं तर तुम्हाला हवं का असं मीं त्याना विचारलं.

त्याना ती कल्पना एकदम पसंत पडली, आणि त्यांच्यासाठीं मीं तें पुस्तक लिहावं असं त्याच बैठकींत ठरलं. मात्र ते म्हणाले,

"आमचा असा शिरस्ता आहे कीं कोणतंहि पुस्तक घेण्याचा पक्का करारमदार करण्यापूर्वी संबंध हस्तलिखित आमच्या हातीं आलं पाहिजे, व हस्तलिखितं वाचून त्यावर अभिप्राय देण्यासाठीं आम्ही जी तज्ज्ञ माणसं ( Readers ) ठेवली आहेत त्यानीं तें पसंत केलं पाहिजे."

या अटीचं भय वाटण्याचं मला काहींच कारण नव्हतं. मीं ती मान्य केली, व तें इंग्रजी पुस्तक लिहावयास त्याच दिवशीं प्रारंभ केला. हें पुस्तक लिहितांना त्याचं नाव 'Eugenics in India' असं मीं ठेवलं होतं. परंतु पुढें प्रत्यक्ष प्रसिद्ध करण्याची वेळ आली तेव्हां विकाजी तारापोरवाला मला म्हणाले,

"तुम्ही दिलेलं नांव मिळमिळीत वाटतं. असं नांव काढा कीं जें ऐकल्याबरोबर काय आहे तरी काय पुस्तकात पाहूं या, अशी जबरदस्त जिज्ञासा उत्पन्न होऊन लोकांना तें विकत घ्यावंसं वाटेल."

मला काही तसं नाव आठवेना. त्याच्या एका इंग्रज स्नेह्यानं 'Sex Problem in Indis' हें नाव सुचविलं. ते मी मान्य केलं, परंतु मनापासून नव्हे.

कारण माझ्या पुस्तकांत Sex Problem ची ( लैंगिक विषयाची ) चर्चा मुळींच नव्हती. केवळ पुस्तकाचा बाजारभाव वाढावा यासाठीं ज्याचा पुस्तकांतील विवेचनाशीं संबध नाहीं असं नाव देणं मला रुचेना. परंतु विकाजी तारापोरवाला याचा फारच आग्रह दिसला तेव्हां मी आपला हट्ट अधिक चालविला नाही. त्याच नांवानं तें पुस्तक प्रसिद्ध झालं.

पुढें मात्र मला या गोष्टीचा पश्चात्ताप झाला. धंदेवाईक प्रकाशकाच्या दृष्टीनं विकाजींनीं केलेला अंदमास अगदीं पूर्ण खरा ठरला. माझ्या पुस्तकाची विक्री फारच चांगली झाली व त्याची दुसरी आवृत्ति काढण्याची वेळ त्याची कल्पना नव्हती इतक्या लवकर आली. त्याच्या पुस्तकांच्या दुकानात पुढच्या बाजूच्या मोठमोठ्या कांचेच्या खिडक्यांत माझ्या पुस्तकाच्या प्रतींची आकर्षक मांडणी केलेली असे. ती पाहिली कीं, मला साहजिकच अभिमान वाटे. परंतु माझ्या पुस्तकाची जाहिरात देशी व परदेशी वृत्तपत्रात ज्या तऱ्हेनं करण्यांत येत होती ती मला अगदीं पसंत नव्हती. कारण त्या जाहिराती वाचून कुणाचाहि असाच ग्रह होण्यासारखा होता कीं, 'Sex Problem in India' हें पुस्तक 'कामसूत्रं' किंवा 'अनंगरंगरतिशास्त्र' अशापैकीं असावं. त्या भडक जाहिराती पाहिल्या कीं मला मोठी चीड येई. अशी जाहिरात न करण्याबद्दल मीं विकाजी तारापोरवाला याना सांगून पाहिलं. शेवटीं तर एकदा तुमच्यावर मी बदनामीची फिर्याद करीन अशी धमकीही मी थट्टेन दिली. परंतु 'अहो असंच चालायचं, उगाच कां चिडता ? ' असं म्हणून त्यानीं सारा प्रकार थट्टेवारी नेला; आणि मग मला कांहींच करता येईना. मी खरोखरच विकाजींना कायदेशीर नोटीस देऊन पाहावी असा कांहीं मंडळींनीं मला कायदेशीर सल्ला दिला. कदाचित् त्यांचा तो सल्ला परिणामकारक ठरला असता. परंतु इतक्या थराला मला गोष्टी न्यावयाच्या नव्हत्या. कारण भडक जाहिरातीची येवढी एक गोष्ट सोडली तर विकाजी माझ्याशीं अतिशय प्रेमळपणानं व सहानुभूतीनं वागत असत, आणि स्नेही या नात्यानं त्यांना दुखविणं माझ्या

मनाला प्रशस्त वाटेना. तेव्हां जाहिरातींचा तो विचित्र प्रकार बंद करण्याच्या भानगडींत न पडता मीं फक्त मनाशीं एक नवा निश्चय केला, कीं ग्रंथा-संबंधीं एखाद्या प्रकाशकाशीं करार करताना त्याची प्रकाशकाकडून वावगी जाहिरात होणार नाहीं असंहि कलम करारात घालण्याची दक्षता आपण घेतली पाहिजे.

सुप्रजाजननशास्त्रावरील इंग्रजी पुस्तक लिहीत असतांनाच 'मानसोन्नति' या पुस्तकाच लेखनहि मी चालविल होतं. परंतु १९२५ सालांतल्या मे महिन्यानंतरच्या पांच महिन्यांत ज्या एका साहित्यविषयक गोष्टींत माझं मन विशेष गुंतलं होतं ती निराळीच होती. ती गोष्ट म्हणजे 'रत्नाकर' मासिकाची स्थापना.

या मासिकाची कल्पना कित्येक दिवसापासून माझ्या व श्रीयुत आप्पा-साहेब गोखले यांच्या मनांत होती. ती मूर्त स्वरूपात येण्याच्या मार्गात मुख्य दोन अडचणी होत्या. एक भाडवलाची, व दुसरी मासिकाचं संपादन करण्याइतकी स्थिरता मला लाभत नव्हती ही. या दोन्ही अडचणी आतां दूर झाल्यासारख्या होत्या. गोखल्यानीं भांडवलाची व्यवस्था केली होती. आणि मी मासिकात जरूर तेवढं लक्ष घालूं शकेन असं मला वाटूं लागलं होतं. अशा प्रकारें दुहेरी अनुकूलता दिसल्यामुळें मासिकाचा सकल्प लांबणी-वर टाकण्याचं काही कारण नाहीं अस मला व गोखल्याना साहजिकच वाटूं लागलं. या नव्या मासिकाच्या बाबतींत आम्हां उभयतात सहकार्याची स्पष्ट समजूत पहिल्यापासून होती ती अशी कीं, मासिकास लागणारा सर्व पैसा गोखल्यांनीं घालावा. मासिकाच्या व्यापातून जो काहीं नफातोटा होईल तो सर्वस्वीं त्याचा समजला जावा. पैशाची जबाबदारी माझ्यावर यत्किंचितहि नसावी. नफ्यातोट्याचाहि संबंध माझ्याकडे बिलकुल नसावा. आणि मासि-काचं संपादन व मासिकासाठीं करावयाचं लेखन मीं मोबदला न घेतां करावं. म्हणजे मासिकासाठीं मी एक पैचासुद्धा खर्च करूं नये व उलटपक्षीं मासिकाकडून एक पैदेखील मीं घेऊं नये असं ठरलं होतं. जोपर्यंत माझा व 'रत्नाकर'चा संबंध होता तोंपर्यंत या समजुतीप्रमाणेच मीं कसोशीनं वागलों. 'रत्नाकर'च्या संपादनाबद्दल अगर त्यांत शेंकडों पृष्ठाचं मीं जे लेखन केलं त्याबद्दल मीं एक पैदेखील घेतली नाहीं. माझ्या 'जादूगार' व

'दौलत' या दोन कादंबऱ्या प्रथम 'रत्नाकरां'तच क्रमशः प्रसिद्ध झाल्या. त्या दोन्ही कादंबऱ्या अतिशय गाजल्या, व त्यामुळें 'रत्नाकर' मासिकास आर्थिक स्थिरता पुष्कळच आली. परंतु या दोन्ही कादंबऱ्यांबद्दल 'रत्नाकर' मासिकाकडून मीं कांहीं एक मोबदला घेतला नाहीं. पुढें तीन वर्षांनीं मीं 'रत्नाकर'चं संपादकत्व सोडलं त्याच्या मुळाशीं माझ्या मोबदल्याचा प्रश्न नव्हता. 'रत्नाकर' आतां स्वतःच्या पायावर उभं राहणारं मासिक झालं आहे, तेव्हां लोकांकडून लेख मागविताना आपण त्यांना अल्प का होईना पण मोबदला देऊं करावा असं माझं म्हणणं होतं; गोखल्याना माझं हें म्हणणं पटेना; व त्यामुळंच मला संपादकत्व सोडण्याचा मार्ग पतकरावा लागला.

'रत्नाकर' मासिकाची योजना करताना त्याचं जें स्वरूप आम्ही ठरविलं तें तोंपर्यंत होऊन गेलेल्या सर्व मराठी मासिकांहून वेगळ्या प्रकारचं होतं. उच्च प्रतीचं कथावाङ्मय पुरविणारं, वाचकाची बहुश्रुतता व विचार-क्षमता वाढेल अशा पकारचं ज्ञालसंर्धक साहित्य सादर करणारं, आणि संगीत, नृत्य, चित्र, शिल्प इत्यादि सर्व कलाविषयीं वाचकाच्या ठिकाणीं उच्च अभिरुचि निर्माण करणारं मासिक काढण्याची आमची इच्छा होती. 'रत्नाकर' दुर्दैवानं दीर्घायुषी ठरल नाहीं. परंतु शेवटपर्यंत त्याचं हें पहिलं संकल्पित स्वरूप कायम होतं; व त्या स्वरूपांत तें निघत असे म्हणूनच त्यानं मराठी साहित्याची जी सेवा केली ती अवधीच्या दृष्टीनं अल्प परंतु गुणाच्या दृष्टीनं फार मोठीं ठरली. आज मराठी लेखकात जे अग्रभागीं आहेत ते सर्व 'रत्नाकर' मासिक निघालं त्या वेळीं विशी पंचविशीच्याजवळ होते. त्यांपैकीं बहुतेकांचीं नांवं मराठी वाचकांच्या परिचयाचीं झालीं तीं 'रत्नाकर' मासिकातूनच; आणि आज घटकेलासुद्धा 'रत्नाकर'च्या जुन्या फायली जो कोणी चाळून पाहील त्याला खचित वाटेल कीं गेल्या वीस वर्षांच्या मराठी भाषेच्या इतिहासात 'रत्नाकर कालखंड' हें एक स्वतंत्र वैभवसंपन्न प्रकरण म्हणावं लागेल. 'रत्नाकर'चा प्रत्येक अंक सरसच निघत गेला, व तज्ज्ञ आणि सामान्य अशा दोन्ही प्रकारच्या वाचकवर्गात त्या मासिकाची लोकप्रियता सारखी वाढत गेली.

मात्र १९२५ सालच्या जून–जुलैमध्यें मासिकाची तयारी करतांना या लोकप्रियतेची आम्हांला खात्री नव्हती. म्हणून आम्हीं असं ठरविलं कीं

दिवाळीच्या सुमारास 'रत्नाकर'चा नमुना अंक काढावा, व आपला हा उपक्रम लोकांना कितपत पसंत पडतो त्याचा अदमास घेऊन तो पुरेसा उत्तेजनपर वाटला तरच १९२६ सालच्या जानुआरीपासून 'रत्नाकर' मासिक रीतसर सुरू करावं.

ता. १४ ऑक्टोबर १९२५ रोजीं 'रत्नाकर' मासिकाचा नमुना अंक प्रसिद्ध झाला. त्याची इतकी निरपवाद प्रशंसा झाली, कीं आमच्या श्रमांचं सार्थक झालं असं आम्हांला वाटलं, व जानुआरीपासून 'रत्नाकर' सुरू करण्याचा बेत आम्ही कायम केला. नवं कांहीं तरी करून दाखवूं असा उत्साह आम्हां दोघाच्याहि ठिकाणीं होता, व मनातली महत्त्वाकांक्षा पूर्ण करण्यासाठीं हवे तेवढे कष्ट करण्याची आमची तयारी होती. एखाद्या कार्याची जबाबदारी अंगावर घेतल्यावर त्यासाठीं मेहनतीची कमाल करण्याची ताकद श्री. आप्पासाहेब गोखले यांच्या ठिकाणीं जेवढी मला दिसली तेवढी अंगीं असणारा दुसरा गृहस्थ साहित्यक्षेत्रांत मला अजून भेटलेला नाहीं. घरच्या दारिद्र्यानं वैतागून कोकणांतून देशावर आलेला कांहीं वर्षांपूर्वीचा गोखल्याचा हा 'आप्पा' अवघ्या दहा पधरा वर्षांत पुण्यांतल्या एका मोठ्या छापखान्याचा लौकिकवान मालक झाला होता, व 'आप्पासाहेब' गोखले अशा नांवानं ओळखला जात होता तो उगीच नव्हे. छापखान्यासंबंधींच्या हरएक कामातली निपुणता, छपाई अधिकाअधिक सुबक व मोहक करण्याचा अनावर छंद, दुसऱ्यासाठीं अंग मोडून झटण्याची तयारी, पैशापेक्षां नांवलौकिक मिळविण्याची तीव्र इच्छा, मोठेपणाची एक पायरी चढल्यावर हुश् करण्याऐवजीं आतां वरची पायरी कशी व केव्हां चढतां येईल असा विचार करण्याची प्रवृत्ति, इत्यादि बहुमोल गुण आप्पासाहेब गोखल्यांच्या ठिकाणीं होते. अडचणींनीं त्रासलेले ते मला क्वचित् प्रसंगीं दिसले असतील; परंतु कष्टाला कंटाळलेले मीं त्याना एकदांहि पाहिले नाहींत. त्यांच्या ठिकाणची निरलस वृत्ति व महत्त्वाकांक्षा म्हणजे 'रत्नाकर' मासिकाचं मोठं भांडवल होतं. 'रत्नाकर'नं अल्पावकाशांत आपलं उच्च स्थान निश्चित केलं याचं अर्धं श्रेय गोखल्यांच्या महत्त्वाकांक्षी, कष्टाळू वृत्तीला व हौसेला दिलंच पाहिजे. उरलेलं त्यांनींच—ते आज जवळ असते तर—मला आनंदानं दिलं असतं !

कारण, त्यानीं ज्याप्रमाणें 'रत्नाकर'साठीं शारीरिक श्रमाची परमावधि करायची ठरविलं होतं त्याप्रमाणेंच आर्थिक मोबदल्याची काडीमात्र अपेक्षा न ठेवता बौद्धिक श्रमांची परमावधि मी करीत होतो. 'रत्नाकर'चा प्रत्येक अंक एखाद्या विशेषांकासारखा वाटला पाहिजे अशी तीव्र इच्छा मीं ठेवली होती. आणि नाविन्यासाटीं सुचेल ती धडपड मी करीत होतो. मराठी वाचकांचं लक्ष क्रिकेट, हॉकी इत्यादि खेळाकडे कां वेधूं नये असं मला वाटे; मुंबईस प्रतिवर्षी होणाऱ्या क्रिकेटच्या सामन्याप्रमाणेंच प्रतिवर्षींच्या चित्रकलाप्रदर्शनांतही मराठी वाचकानीं लक्ष घातलं पाहिजे असं माझ्या मनांत येई; संगीत, नृत्य इत्यादि कला, व त्या त्या प्रांतांतील नामांकित कलावंत यांचा परिचय मराठी वाचकांना सुंदर सुंदर लेखाच्या द्वारें कां करून देऊं नये असं मला वाटे. इतकंच काय, "गुजगोष्टी" हा वाङ्मय प्रकार मराठींत रूढ करावा असं मला वाटलं तेही नाविन्याच्या या हौसेमुळेंच !

इंग्रजी साहित्याच्या वाचनानं मला कित्येक दिवसापासून वाटूं लागलं होतं कीं कादंबरीच्या क्षेत्रापेक्षांहि निबंधाच्या बाबतीत मराठी भाषा अजून दोन शतकं मागं रेंगाळत आहे. निबंधाचा आधुनिक थाट मराठींत रूढ व्हायला पाहिजे. चेस्टरटन, गार्डिनर, लिंड इत्यादींचे निबंध वाचले कीं माझ्या मनांत येई, असे निबंध मराठीत कां लिहिले जाऊं नयेत. आणि या लेखकाहूनहि माझी इच्छा जागृत करण्याचं काम कोणी अधिक केलं असेल तर ते 'रिचर्ड किंग' या लेखकानं. इतर सर्व निबंधकारापेक्षां या लेखकाच्या निबंधात विनोद, सूक्ष्म उपहास, जिव्हाळा, अन् वाचकाशीं हितगुज केल्याप्रमाणें बोलल्याचा भास मला अधिक प्रमाणात आढळला; व "Folded Hands", आणि "Over the fireside with silent friends" इत्यादि त्याचे निबंधसंग्रह वाचून मीं मनाशीं निश्चय केला, कीं निबंधाची ही मोहक तऱ्हा आपण मराठींत आणावयाचीच. १९२५ च्या नोव्हेंबर महिन्यात मीं माझी पहिली 'गुजगोष्ट' लिहिली. तिचं नांव 'सुहास्य' !

अशा प्रकारें मी व आप्पासाहेब गोखले आपापल्या अंगचं कर्तृत्व एकवटून 'रत्नाकर' मासिकासाठीं झटत होतों. प्रशंसेचा भरपूर मोबदला

आम्हांला मिळत होता, व आपण जें करीत आहों त्याचं सबंध महाराष्ट्र चीज करीत आहे या उत्साहवर्धक जाणिवेमुळें आम्ही मासिकासंबंधीं नवे नवे बेत आखीत होतों.

मी पुण्यासच पुढें चार-पांच वर्षं राहिलों असतों तर 'रत्नाकर' मासिकाचा इतिहास झाला त्याहून निराळा झाला असता. गोखल्याचं व माझं निकटवर्तित्व टिकलं असतं तर त्यांच्यावरचीं—म्हणजे पर्यायान 'रत्नाकर'-वरचीं—संकटं मला वेळीच कळलीं असतीं, व तीं दूर करण्याचे मार्ग मला दिसले असते. कदाचित् 'रत्नाकर' मासिक आज घटकेपर्यंतही टिकवितां आलं असतं !

पण योगायोग निराळा होता.

१९२६ च्या जून महिन्यांत कोल्हापूर येथील राजाराम कॉलेजमध्यें माझी नेमणूक होण्याचा संभव उत्पन्न झाला. श्रीयुत आण्णासाहेब लठ्ठे त्या वेळीं दिवाण होते. त्यांची माझी मुलाखत झाली तेव्हा मीं स्पष्ट सांगितल, कीं सिंध हैद्राबादची व नागपूरची नोकरी मला अमुक अमुक कारणांसाठीं सोडावी लागली; माझा राजकीय पूर्वेतिहास व माझीं इतर मतं हीं सर्व लक्षांत घेऊन तुम्हांला माझी नेमणूक करता येत असेल तर करा. दिवाण-साहेब लठ्ठे यानीं उत्तर दिल, " तुमची मला संपूर्ण माहिती आहे, व म्हणूनच तुमची नेमणूक मी करीत आहें. "

जुलैच्या पहिल्या तारखेपासून मी राजाराम कॉलेजांत काम करूं लागलों !

# प्रो. ना. सी. फडकेकृत पुस्तकें.

## कादंबऱ्या

१ अल्ला हो अकबर
२ कुलाब्याची दांडी (२ री आ.)
३ जादुगार (२ री आ.)
४ दौलत (२ री आ.)
५ अटकेपार ६ निरंजन
७ कलंकशोभा ८ उद्धार
९ काश्मिरी गुलाब १० आशा
११ प्रवासी (२ री आ.)
१२ समरभूमि १३ उन्माद
१४ गुप्त प्रायश्चित्त १५ इंद्रधनुष्य
१६ प्रतिज्ञा १७ वादळ
१८ शाकुंतल

## प्रबंध

१ मानसोपचार (२ री आ.)
२ मानसोन्नति
३ सुखाचे संसार
४ संततिनियमन
५ आजचे तरुण स्त्री-पुरुष व त्यांजपुढील प्रश्न (२ री आ.)
६ प्रतिभासाधन (३ री आ.)
७ वाङ्मयविहार (२ री आ.)
८ आधुनिक गीता (२ री आ.)
९ मानसमंदिर
१० साहित्य व संसार (२ री आ.)
११ आकाशवाणी
१२ वेचलेले मोती
१३ टाकीचे घाव
१४ टाकाच्या फेकी

## व्याख्यानें

१ गाजलेली भाषणें
२ मित्रहो !

## गोष्टी

१ प्रो. फडके यांच्या गोष्टी भाग १ ला
२ ,, ,, ,, ,, ,, २ रा
३ लीला आणि इतर गोष्टी
४ नमुनेदार गोष्टी
५ उल्हासकथा
६ वत्सला आणि इतर गोष्टी
७ चंद्रा आणि इतर गोष्टी
८ लाडकी लक्ष्मी आणि इतर गोष्टी

## ललितनिबंध

१ गुजगोष्टी (२ री आ.)
२ नव्या गुजगोष्टी (२ री आ.)
३ धूम्रवलयें

## चरित्रें

१ दादाभाई नौरोजी (३ री आ.)
२ टेरेन्स मॅक्स्विनी
३ डी. व्हॅलेरा

## नाटकें

१ युगांतर
२ संजीवन
३ जडावाची देवी
४ तोतया नाटककार
५ आगलावी
६ क्षमेसाठी अपराध

## इंग्रजी

1 *Sex Problem in India* (2nd Edition)
2 *Psychology*
3 *Elements of Ethics*
4 *Manual of Logic* (3rd Edition)
5 *Birth Control* (2nd Edition)
6 *History of Philosophy*

# आमचीं प्रकाशनें आणि इतर पुस्तकें

**प्रकाशनें—**

साहित्यसेवेंतील स्मृती–भाग १ ला
शाकुंतल
काल व आज
बोलघेवडा
लाडकी लक्ष्मी
छोटी नली
चंद्रा
वत्सला
धूम्रतरंग
उल्हासकथा
सुधारणा
श्रावणातल्या विजा
राखेंतले निखारे
मंदज्योति
अनिर्बंध जीवन
सुरसुरी
वणवा
चित्रा
चांदण्यांतील सांवल्या
कलावंतांच्या सहवासांत
नवा प्रातःकाळ
स्वाति
नादनिनाद

**इतर पुस्तकें—**

तुटलेले तारे
प्रकाशांतील व्यक्ति
नीलेचा दिलरुबा
मोगरीचा गजरा
भंगलेली मूर्ति
लघुकथा
सह्याद्रीच्या पायथ्याशीं
ना० गोखले–चरित्र
दुसरी सावली
बोकीलाच्या गोष्टी
सैन्यातील आठवणी
जीवनसंग्राम
आई
पारिजातकाची फुलें

**आगामी प्रकाशनें—**

ना. सी. फडके

अल्ला हो अकबर
साहित्यसेवेंतील स्मृति भाग २ रा

वि. वि. बोकील,

चल पुढें

**कॉन्टिनेंटल बुक सर्व्हिस,**
**टिळक रोड पुणें २.**